# महाराष्ट्राचे शिल्पकार बॅ. नाथ पै



Raja Badsal




जयानंद मठकर

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : सप्टेंबर, २००७
द्वितीया आवृत्ती : सप्टेंबर, २००८
महाराष्ट्राचे शिल्पकार : क्र. ३०

प्रकाशक :
**सचिव,**
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४.



मुद्रक :
प्रमोद भोगटे
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : २४९४ ५६१५)

मुख्यपृष्ठ : राजा बडसल, पुणे

किंमत : रु. ३५/-

*या पुस्तकात व्यक्त केलेली मते स्वतः लेखकाची असून या मतांशी साहित्य आणि संस्कृती मंडळ व महाराष्ट्र शासन सहमत असलेच असे नाही.*

# निवेदन

कै. बॅ. नाथ हे स्वातंत्र्योत्तर काळामध्ये महाराष्ट्राला लाभलेले एक प्रखर बुद्धीमत्तेचे व प्रतिभाशाली राजकीय व्यक्तिमत्त्व होते. स्वातंत्र्यानंतर भारतामध्ये जी सांसदीय लोकप्रणाली सुरू झाली, तिचा पंडितजी व त्यांचे दिग्गज सहकारी यांनी पाया घातला. तो पाया किती भक्कम होता त्याचे प्रत्यंतर आज आपण घेत आहोत. अनेक संकटे आणि विघ्ने यांचा यशस्वी मुकाबला करीत स्वातंत्र्याची गेली ६० वर्षे या प्रचंड लोकसंख्येच्या व अतीविशाल आकाराच्या खंडप्राय देशामध्ये विविधतेतून एकात्मता टिकलेली आहे व तिला सांसदीय कार्यपद्धतीचा मोठा आधार आहे. पंडितजी व त्यांचे सहकारी हे राज्यकर्ते होते. परंतु त्यांना त्यांच्या तोलामोलाचे दिग्गज विरोधक म्हणू त्या काळी संसदेत लाभलेले होते. त्यातील एक तरुण तडफदार आणि आघाडीचे व्यक्तिमत्त्व म्हणजे बॅ. नाथ पै. त्यांच्या संसदीय कार्याचा अनुभव, वक्तृत्व व राष्ट्रीय दृष्टी यांचा पंडितजीसारख्या बुजुर्ग राजकारण्यांवरसुद्धा प्रभाव पडलेला होता.

समाजवादी विचार, सांसदीय लोकशाहीवरील दृढ विश्वास व जनसामान्यांबद्दलची उत्कट तळमळ हे बॅ. नाथ यांचे स्वभाव वैशिष्ट्य होते. सामान्य मध्यमवर्गीय कुटुंबामध्ये जन्म घेऊन त्यांनी अल्पवयामध्ये प्रखर बुद्धीची झेप प्रगट केली. राजकारणात पदार्पण केल्यानंतर त्यांनी जे कर्तृत्व दाखविले त्याला तुलना नाही. कोकणातील वेंगुर्ले या छोट्या गावात जन्म घेऊन तेथील गोरगरीब जनतेबरोबर बालपण घालवून, जेव्हा बॅरीस्टरी संपादन करून ते राजकारणात उतरले तेव्हा कोकण या त्यांच्या मायभूमीनेच त्यांना लागोपाठ प्रचंड मतदान करून आपला प्रतिनिधी या नात्याने लोकसभेमध्ये पाठविले. तेथे बॅ. नाथ पै यांनी देशातील जनतेबरोबर आपल्या राजापूर मतदारसंघातील सामान्य मतदारांचे अमोघ प्रतिनिधीत्व केले.

अशा या लोकशाहीच्या व समाजवादाच्या निःस्सिम वारकऱ्यांचे महाराष्ट्रावर व देशा मोठे ऋण आहे. या ऋणातून अल्पप्रमाणात मुक्त होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने '**महाराष्ट्राचे शिल्पकार**' नावाची जी चरित्रमाला प्रकाशित करण्यात येत आहे.

तिच्या माध्यमातून त्यांचे चरित्र आजच्या पिढीसमोर सादर व्हावे या हेतूने हा ग्रंथ प्रकाशित करण्यात येत आहे.

बॅ. नाथ पै यांचे समकालीन सहकारी व निकटचे मित्र श्री. जयानंद मठकर यांनी आमच्या विनंतीला मान देऊन तत्परतेने हे चरित्र लिहून दिले त्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. बॅ. नाथ पै यांचे हे चरित्र गेल्या पीढीतील वाचकांना पुनःस्मरणाचा व नव्या पीढीला स्फूर्तीचा प्रत्यय देईल अशी आशा आहे.

**मधु मंगेश कर्णिक**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# अणुक्रमणिका

# बालपण व शिक्षण

संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाने भारताला एक अमोल रत्न दिले. त्या रत्नाचे नाव बॅ नाथ पै. १९५७ च्या लोकसभा निवडणुकीत राजापूर लोकसभा मतदारसंघातील जागा संयुक्त महाराष्ट्र समितीचा घटक पक्ष असलेल्या समाजवादी पक्षाच्या वाट्याला आली होती. १९५२ साली या मतदारसंघातून ज्येष्ठ समाजवादी नेते, सिंधुदुर्ग जिल्ह्याचे सुपुत्र नारायण गणेश उर्फ नानासाहेब गोरे यांनी निवडणूक लढविली होती. पण १९५७ साली नानासाहेब गोरे यांनी पुणे शहर लोकसभा मतदारसंघातून निवडणूक लढविण्याचा निर्णय घेतल्याने राजापूर मतदारसंघातून समाजवादी चळवळीत आघाडीवर असलेले सिंधुदुर्ग जिल्ह्याचे सुपुत्र बॅ. नाथ पै यांना राजापूर लोकसभा मतदारसंघातून समाजवादी पक्षातर्फे उभे करण्यात आले. नाथ पै हे बॅरिस्टर होते. कायद्याचे निष्णात पंडित होते. कोकणविषयक प्रश्नांची त्यांना जाण होती. त्यांच्याठायी अमोघ वक्तृत्व होते. आपल्या अलौकिक वक्तृत्वाने बॅ. नाथ पै यांनी राजापूर लोकसभा मतदारसंघातील मतदारांची मने जिंकली आणि ते लोकसभेवर निवडून आले आणि एक झाकले माणिक उजेडात आले. उत्कृष्ट संसदपटू आणि आंतराराष्ट्रीय कीर्तीचा समाजवादी नेता असात अलौकिक सन्मान संपादन केलेल्या कोकणच्या या सुपुत्राचा जन्म २५ सप्टेंबर १९२२ रोजी वेंगुर्ले येथे झाला.

नाथचे वडील कै. बापु पै यांनी त्या काळात बी.ए.ची पदवी संपादन केल्यावर पोष्ट खात्यात सरकारी नोकरी पत्करली. ते पोस्टमास्तर होते पण वारंवार होणाऱ्या बदल्यांना कंटाळून त्यानी पोष्ट खात्यातील नोकरीचा राजीनामा दिला आणि वेंगुर्ले येथील ए.पी.मिशन हायस्कूलमध्ये त्यांनी शिक्षकाची नोकरी स्वीकारली. त्यांच्या वेंगुर्ले येथील वास्तव्यात नाथचा जन्म झाला, नाथचे पाळण्यातील नांव ‘पंढरीनाथ’ ठेवण्यात आले होते. पण सर्वजण त्यांना ‘नाथ’ या नावाने संबोधित असत. त्यामुळे व्यवहारात तेच नाव रूढ झाले. नाथची आई आणि भावंडे मात्र त्यास प्रेमाने ‘राजा’ नावाने संबोधित असत.

बालपणी नाथला प्लेगची लागण झाली होती. त्या काळात प्लेगची लागण म्हणजे देवाघरचे बोलावणे अशी स्थिती होती. आईच्या आणि भांवडांच्या अविश्रांत सेवेने नाथ या दुखण्यातून वाचले पण दुर्दैवाने वडिलांचे कृपाछत्र त्यांच्या बालपणीच हिरावले गेले. नाथ आठ महिन्यांच्या असताना त्यांच्या वडिलांचे हृदयविकाराने दुःखद निधन झाले. पै कुटुंबावर तर हा वज्राघाताच होता. पण नाथची आई मोठी धीराची बाई होती. पती निधनाने खचून न जाता धैर्याने परिस्थितीला सामोरे जाऊन तिने मुलांचे संगोपण केले. मुलांवर चांगले संस्कार केले आणि त्यांना स्वाभिमानाने जगण्याची शिकवण दिली.

नाथ पै जात्याच अत्यंत हुभार होते. एक पाठी होती. पण गणित विषयात चक्के होते. एकदा गणित चुकले म्हणून वर्ग शिक्षकांनी नाथला खरपूस मार दिला. नाथने घरात या गोष्टीची वाच्यता केली नव्हती. पण नाथच्या हातापायावरील वळ पाहून गुरूजींनी दिलेली शिक्षा घरातील सर्वांना समजली. नाथ घरातला सर्वात लहान, त्यामुळे सर्वांचा अतिशय लाडका होता. नाथला गुरूजीनी दिलेली शिक्षा पाहून नाथचे भाऊ संतापले. दुसऱ्या दिवशी शाळेत जाऊन गुरूजींना जाब विचारायचे त्यांनी ठरविले. नाथला हे समजताच नाथने सर्वांना आवरले. नाथ म्हणाला, “माझ्या हितासाठीच त्यांनी मला शिक्षा केली आहे. तुम्ही जाब विचारणार असाल तर ते यापुढे मला शिक्षा करणार नाहीत. पण माझ्याकडे दुर्लक्ष करतील. त्यामुळे माझेच नुकसान होईल!” अशा शब्दात आपल्या वडीलबंधूना त्यांनी समजाविले.

त्या काळात चौथीची परीक्षा उपशिक्षणाधिकारी घेत असत. गणिताचे प्रश्न तोंडी विचारले जात असत. उत्तरे पाटीवर लिहायची. ज्यांची उत्तरे लिहून होत असत त्यांनी उत्तरे लिहिल्यावर खाली बसायचे अशी प्रथा होती. मग उत्तरे तपासली जात. वर्गशिक्षकांनी नाथच्या पुढच्या व मागच्या विद्यार्थ्यांना नाथला पाटी दाखविण्याची सूचना केली होती. पण नाथने साफ सांगितले की पाटी दाखविण्याची गरज नाही. दाखविली तरी मी पाहाणार नाही. कॉपी करण्याचा खोटेपणा मी करणार नाही. अपयश आले तरी परवडेल; पण खोटेपणाचा कलंक नको. हा नाथाचा लहानपणातील बाणा नाथला मोठेपणी मोठेपण देऊन गेला.

नाथला मुरली वाजवायचा छंद त्या वयात जडला होता. तासन्तास तो मुरली वाजवीत बसत असे. तसेच खारी आणि ससे पाळण्याचाही नाद नाथला लागला होता. त्या वयात ससे आणि खारी पाळण्यात आणि मुरली वाजविण्यात नाथ दंग असे. साहस हा नाथचा स्वभावच होता. नाथचे आजोळ वेंगुर्ल्यानजीक आडारीला अडारकरांकडे. त्या वयात एकदा आडारीला गेला होता. नाथचे मामेभाऊ त्यावेळी कठडा नसलेल्या विहिरीत पोहत होते. नाथची गंमत करण्याच्या इराद्याने नाथला मामेभावंडानी डिवचले आणि म्हटले, "नाथा, अरे बघतोस काय? टाक उडी." आणि पुढल्याच क्षणी नाथने बेधडक पाण्यात उडी टाकली. नाथाच्या नाकातोंडात पाणी गेले. पण पठ्ठा पोहायला शिकला. मोठेपणीही नाथाचा पोहण्याचा नाद सुटला नव्हता. गरीने मासे पकडणे हा नाथच असाच आवडचा छंद होता. मोठेपणी कोकणात आला की नाथला पोहण्याची आणि गरीने मासे पकडण्याची लहर यायची.

प्राथमिक मराठी सातवीच्या परीक्षेचे (व्हर्नाक्युलर फायनलचे) केंद्र त्या काळात वेंगुर्ल्यात नव्हते. या परीक्षेसाठी विद्यार्थ्यांना मालवणला जावे लागत असे. त्या काळात आत्ताच्यासारख्या मोटार सर्व्हिस गाड्या नव्हत्या. मालवणला त्या काळात बोटीने जावे लागत असे. इतर सवंगड्यासमवेत नाथ मराठी सातवीच्या परीक्षेला बोटीने माणवणला गेला. मालवणचे पाणी मचूळ. नाथ आणि त्याचे सवंगडी हे पाणी प्यायला कंटाळत. पण नाथनेच त्यावर तोडगा शोधून काढला. या काळात गुट्टीच्या सोडावॉटरची बाटली दोन पैशात (ढबू पैसा) मिळत असे. ती बाटली फोडायची; त्यात थोडे मीठ टाकायचे की त्या बाटलीतील गॅस निघून जायचा. मग ते पाणी प्यायचे. सकाळच्या जेवणाबरोबर एक बाटली आणि सायंकाळच्या जेवणाबरोबर एक बाटली. केवळ एक आण्याच्या (चार पैसे) मोबदल्यात आपल्या सवंगड्यांच्या पाण्याचा प्रश्न नाथने सोडवला. नाथच्या जिज्ञासू आणि कल्पक बुद्धीची चमक अशाप्रकारे बालवयातच प्रगट झाली होती.

फायनल परीक्षेनंतर नाथने वेंगुर्ल्याच्या रांगणेकर हायस्कूलमधून माध्यमिक साळेतील तीन इयत्तांचा अभ्यास एक वर्षात पूर्ण केला. या शाळेवर अखेरपर्यंत नाथचे अतूट प्रेम राहिले. खाजगी संभाषणात या शाळेतीन आठवणी तो तन्मयतेने सांगत असे. इंग्रजी भाषेवर असामान्य प्रभुत्व होते.

त्याचा उदयाच्या भावी उज्ज्वल यशाचा पाया या शाळेतील शिक्षणाने घातला गेला होता. तर्खडकरची इंग्रजी भाषांतर-पाठमालेती तिन्ही पुस्तके या शाळेत गुरूजींनी नाथकडून मुखोद्गत करून घेतली होती. नाथच्या तल्लख बुद्धीची आणि एकपाठीपणाची चमक वयातही दिसून आली होती. आपल्या मनात देशप्रेम आणि क्रांतिकारकांबद्दल आदर या शाळेतील संस्कारांनी वृद्धिंगत झाला, याचा उल्लेख नाथच्या बोलण्यात आवर्जून असायचा.

नाथचे मोठे बंधू श्री. अनंतराव. सर्वजण त्यांना भाई म्हणत. भाईंनी त्या काळात बेळगावला टिशकवाडीत दुकान सुरू केले होते. भाईची मोठी बहीण बेळगावला दिली होती. तिच्या आधाराने भाईने बेळगावला प्रयाण केले होते. भाईचे दुकान बरे चालत असे. त्यामुळे पै कुटुंबाने बेळगावला प्रयाण केले. पुढे नाथ पै यांचे दुसरे बंधू भाऊ पै यांनीही बेळगावला दुकान सुरू केले. त्यांचे दुकान चांगले चालत असे. त्यामुळे पै कुटुंबाला स्थैर्य प्राप्त झाले होते. नाथ बेळगावला गेला आणि त्याच्या जीवनाचे नवे पर्व सुरू झाले. बेळगाव ही नाथची कर्मभूमी झाली.

बेळगावला नाथने ‘बेनन स्मिथ’ हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. बेनन स्मिथ ही खिस्ती मिशनऱ्यांनी १८३२ साली सुरू केलेली विख्यात शाळा. त्यावेळच्या मुंबई प्रांतात मिशनऱ्यांनी चालविलेली ही शाळ असली तरी धर्मांतरावर या शाळेत फारसा भर दिला जात नसे. त्यामुळे खिश्चनेतर समाजातील मुलेही या शाळेत मोठ्या संख्येने प्रवेश घेत असत. या शाळेत प्रत्येक वर्गाला आठवड्याला दोन तास बायबलचे असत. त्या तासांना नीतिधर्मावरही चर्चा होत असे. त्यामुळे खिश्चन धर्माची आणि त्या धर्माचा ग्रंथ बालबलचाही नाथकडून सखोल अभ्यास झाला नाथची स्मरणशक्ती अविस्मरणीय होती. एकदा वाचले की लक्षात राही. नाथचे वाचनही चौफेर होते. बेबन स्मिथ हायस्कूलमधील शिक्षण आणि संस्कार नाथ पैना जीवनात उपयुक्त ठरले. या शाळेत नाथ पै लवकर रमले. इंग्रजी आणि संस्कृतची गोडी त्यांना येथेच लागली. फ्रेंच आणि पर्शियन भाषाही या शाळेत शिकविल्या जात असत. कुरियनसारखे शिक्षक बायबलच्या तासांना नीतिधर्मावर चर्चा आणि वादविवाद घडवीत असत. या वादविवादातून नाथ पै चमकू लागले होते.

या शाळेत श्री. नागगौडा नावाचे आगरकरपंथीय शिक्षक होते. आगरकरांचा सुधारणावाद त्यांनी विधवेशी लग्न करून आचरणात आणला होता. ते शास्त्र आणि मराठी शिकवीत. मॅट्रिकच्या गद्यपद्य वेच्यांमध्ये आगरकरांवर टिळकांनी लिहिलेला मृत्युलेख होता. हा लेख शिकविताना नागगौडासर आगरकरांची ध्येयनिष्ठा, त्यांचा करारीपणा आणि समाजसुधारणे-विषयीची कळकळ समर्थपणे विद्यार्थ्यांसमोर विशद करीत. त्यांच्या शिकवणीचा ठसा नाथच्याल मना उमटणे स्वाभाविक होते. या शाळेत मराठे नावाचे शिक्षक जीवशास्त्र, वनस्पतीशास्त्र आणि भूगोल हे विषय शिकवीत. व्यासंगी शिक्षक अशी त्यांची ख्याती होती. अनेक विषयांचे त्यांचे ज्ञान अद्ययावत होते. ते रात्रौ विद्यार्थ्यांना शाळेत बोलावत असत आणि आकाशातील तारकांचा, ग्रहांचा परिचय करून देत. मुलांचे प्रबोधन होई आणि त्यांच्या ज्ञानात मोलाची भर पडत असे. ही शाळा अभ्यासाप्रमाणे खेळातही अग्रेसर होती. या शाळेने महाराष्ट्राला अनेक हॉकी खेळाडू पुरविले आहे. अशा या शाळेतून १९४० साली नाथ पै मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले.

मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर नाथ पै यांनी बेळगांवच्या लिंगराज कॉलेजमध्ये एफ्.वाय.च्या वर्गात प्रवेश घेतला. लिंगराज कॉलेजमध्ये शिकत असताना नाथने वक्तृत्व स्पर्धेत अनेक पारितोषिके पटकाविली होती. त्या काळी एफ्.वाय.ची परीक्षा कॉलेजमध्ये घेतली जात असे. इंटरची परीक्षा विद्यापीठ घेत असे. लिंगराज कॉलेजमधून १९४१ साली एफ्.वाय.ची परीक्षा उत्तीर्ण होऊन इंटरसाठी नाथ पै यांनी पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयात प्रवेश घेतला. फर्ग्युसन कॉलेजमधअये शिकताना गोखले करंड वक्तृत्व स्पर्धेसाठी नाथ पै यांची निवड झाली. या स्पर्धेमध्ये नाथचे भाषण फार गाजले. नाथ पै यांना पहिले पारितोषिक मिळाले. त्याचबरोबर गोखले करंडकही फर्ग्युसन कॉलेजला मिळाला. त्यानंतर अलाहाबाद येथे झालेल्या अखिल भारतीय महाविद्यालयीन विद्यार्थी वक्तृत्व स्पर्धेसाठी नाथ पै यांना पाठविण्यात आले. या स्पर्धेतही नाथने पहिले पारितोषिक मिळविले. फर्ग्युसन कॉलेजमध्ये डिबेटिंग सोसायटीच्यावतीने विद्यार्थ्यांचे पार्लमेंट निवडले जाई. त्यांत मजूर मंत्रिमंडळा अधिकारावर होते. ग. प्र. प्रधान या लुटूपुटूच्या पार्लमेंटमध्ये प्रधानमंत्री होते. तर नाथ पै पुरवठामंत्री होते. या लुटूपुटूच्या संसदेमध्ये नाथ पै

चमकले. मुद्देसूद बोलणे आणि अचूक उत्तर देणे या यशस्वी संसदपटूसाठी आवश्यक असलेल्या गुणांचे दर्शन त्याकाळीही नाथ पै यांच्याकडून घडले.

१९४२ सालचा तो काळ, स्वातंत्र्याच्या भावनेने मंतरलेला होता. महात्मा गांधीनी ब्रिटिशांना 'भारत छोडो'चा इशारा देऊन स्वातंत्र्याच्या अंतिम लढाईची तुतारी फुंकली. वातावरण तापू लागले होते. संवेदनशील नाथ परीक्षेला न बसता स्वातंत्र्याच्या संग्रामात उडी घेण्यासाठी कॉलेज सोडून रळ बेळगांवला निघून गेले. ७ ऑगस्टला अखिल भारतीय काँग्रेसचे अधिवेशन मुंबईच्या गवालिया टँकवर भरले. ८ ऑगस्टला या अधिवेशनात महात्मा गांधी यांनी 'भारत छोडो' ठराव मांडला आणि ९ ऑगस्टला पहाटेपासून देशभर काँग्रेस कार्यकर्त्यांच्या अटकेचे सत्र सुरू झाले. समर्पित भावनेने या लढ्यात सहभागी होण्याचे महात्मा गांधीनी आवाहन केले होते. नाथ पै भूमिगत झाले आणि स्वातंत्र्याच्या लढ्यात स्वतःला झोकून दिले. पण नाथच्या या निर्णयाने त्याच्या शिक्षणात खंड पडला. लढ्याचा बहर ओसरल्यावर आणि तुरूंगातून सुटून आल्यावर १९४५ साली नाथाने बेळगांवच्या लिंगराज कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. १९४५ साली ते इंटरची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि १९४७ साली त्यांनी बी.ए.ची पदवी संपादन केली.

बी.ए. झाल्यावर नाथने इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर व्हावे अशी नाथच्या घरच्या सर्वांचीच इच्छा होती. पण कायद्याच्या अभ्यासासाठी इंग्लंडमध्ये जाऊन बॅरिस्टर होण्याची गरज नाही. भारतात राहूनही कायद्याचा अभ्यास करता येईल असे नाथच्या मित्रमंडळींचे मत होते. बेळगांवचे डॉ. याशगी हे पै कुटुंबीयांचे निकटवर्ती. त्यांनी नाथना भारतात राहूनही कायद्याचा अभ्यास करता येईल असे सुचविताच नाथ पै म्हणाले, "माझ्या वडिलांचेच नव्हे तर आमच्या कुटुंबातील सर्वांचे स्वप्न आहे की मी बॅरिस्टर व्हावे. भारताच्या राजकारणात आज बॅरिस्टरांना मान-महत्त्व आहे. महात्मा गांधी, महमद अली जीना, स्वातंत्र्यवीर सावरकर, पंडित जवाहरलाला नेहरू, असफअली सारे बॅरिस्टर आहेत. त्यामुळे मला वाटते आपणही बॅरिस्टर व्हावे. तसेच देशामध्ये आपण संसदीय लोकशाही स्वीकारली आहे. यासाठी इंग्लंडमध्ये राहून संसदीय लोकशाहीचा अभ्यास करावा अशी माझी इच्छा आहे."

बॅरिस्टर होण्याच्या इर्षेने वयाच्या पंचवीसाव्या वर्षी नाथ पै इंग्लंडला रवाना झाले. इंग्लंडमध्ये त्यांनी 'लिंकन्स इन'मध्ये प्रवेश घेतला. या लिंकन्स इन मधील जे विद्यार्थी दुसऱ्या महायुद्धात लढले त्यांची नांवे सुवर्ण अक्षरांनी लिहिली आहेत. ही कृतज्ञता आणि गुणग्राहकता पाहून नाथाचे मन हेलावले.

इंग्लंडमधील वास्तव्यात नाथ पै यांचा ब्रिटनमधील लेबर पार्टीच्या कार्यात आणि कामगार चळवळीत सक्रिय सहभाग असे. ब्रिटनमधील या वास्तव्यात नाथ पै यांना कामगार चळवळीच्या अभ्यासासाठी ऑस्ट्रिया सरकारची शिष्यवृत्ती मिळाली. कामगार चळवळीच्या अध्ययनासाठी नाथ पै यांचे वास्तव्य काही काळ ऑस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना शहरांत होते. ऑस्ट्रियातील मुक्कामात नाथ पै जर्मन भाषा शिकले. तेथील 'ट्रॉटझडेम' आणि 'आबैंटर' आदि नियतकालिकातून भारतीय राजकारणावर त्या काळात अनेत माहितीपूर्ण लेख लिहिले. तेथील वृत्तपत्रांनी त्यांच्या मुलाखती घेऊनही छापल्या. त्यामुळे एक अभ्यासू विचारवंत राजकारणी अशी आपली प्रतिमा युरोपांत त्या काळात नाथ पै यांनी निर्माण केली होती.

ऑस्ट्रियामधील अध्ययन संपवून नाथ पै लंडनला परतले. डिसेंबर १९४७ मध्ये बॅरिस्टरीच्या अध्ययनासाठी नाथ पै इंग्लंडला गेले. पण लेबरपार्टी आणि कामगार चळवळीतील सहभागामुळे त्यांचा बॅरिस्टरीच्या परीक्षेचा अभ्यास संथपणाने चालला होता. या काळात बॅरिस्टरीच्या दोन परीक्षा नाथ पै उत्तीर्ण झाले होते. तिसरी आणि अंतिम परीक्षा द्यावयाची राहिली होती. त्या परीक्षेची तयारीही नाथ पै यांनी चालविली होती. पण परीक्षेच्या तारखेपूर्वी १९५२ साली भारतात घटनेप्रमाणे लोकसभेची आणि विधानसभेची पहिली सार्वत्रिक निवडणूक जाहीर झाली. बेळगांवच्या समाजवादी पक्षाने बेळगांव शहर विधानसभा मतदारसंघातून नाथ पै यांनी मुंबई विधानसभेची निवडणूक लढविण्याचा निर्णय घेतला. पक्षाच्या सेंट्रल पार्लमेंटरी बोर्डानेही या निर्णयाला मंजुरी दिली. त्यामुळे परीक्षेला न बसताच निवडणूक लढविण्यासाठी नाथ पै यांना भारतात परत यावे लागले. बेळगांवमधील तरूणवर्ग नाथ पै यांच्या मागे होता. पण बहुसंख्य तरूण २१ वर्षाखालील होते; त्यामुळे मतदार नव्हते. परिणामी नाथ पै यांना निवडणुकीत हार पत्करावी लागली.

निवडणुकीनंतर नाथने परत इंग्लंडला जाऊन बॅरिस्टरची शेवटची परीक्षा देण्याचे ठरले आणि १९५२च्या मध्यावर नाथ पै परत इंग्लंडला रवाना झाले. तेथे गेल्यावर ते परत विविध संस्थांच्या कामत गुरफटले गेले. पण यावेळी त्यांनी अभ्यासाकडे विशेष लक्ष दिले आणि १९५३च्या पूर्वार्धात ते बॅरिस्टरीची परीक्षा पहिल्या श्रेणीत उत्तीर्ण झाले. पै कुटुंबाचे, आई-वडिलांचे, भावंडांचे आणि स्वतःचेही बॅरिस्टर होण्याचे स्वप्न खडतर परिश्रण घेऊन आणि अपार कष्ट उपसून त्यांनी साकार केले. या शैक्षणिक यशांत त्यांचे मोठे बंधू अनंतराव यांचा वाटा सर्वाधिक होता. नाथ पै यांच्या जीवनातील तो अत्यंत समाधानाचा क्षण होता.

नाथ पै यांनी भारतात परतायचे ठरविले खरे; पण नाथचा संधिवाताचा जुना रोग पुन्हा बळावला. व्हिएन्ना येथे नाथ पै यांच्या आजारावर उपचार करण्यात आले आणि नाथ पूर्ण बरे झाले. हे उपचार चालू असताना वेळ वाया जाऊ नये म्हणून नाथने व्हिएन्ना युनिर्व्हसिटीच्या प्राध्यापकांच्या सल्ल्याने 'उपनिषदांचा जर्मन तत्त्वज्ञानावरील परिणाम' या विषयावर पी.एच्.डी.साठी प्रबंध सादर करण्याचा निर्णय घेतला आणि अध्ययनास सुरुवात केली. आता ही पदवी संपादन करायची तर आणखी काही वर्षे तेथे वास्तव्य करणे ओघाने आलेच. पण नाथला हे सर्वच दृष्टीने अशक्य होते. नाथची अभ्यासूवृत्ती पाहून विद्यापीठाने भारतातून प्रबंध सादर करण्यास नाथला अनुमती दिली होती. पण भारतात परत आल्यावर नाथ पै सार्वजनिक कार्यात, राजकारणात आणि परिवर्तनाच्या चळवळीत इतके व्यग्र झाले की अखेरपर्यंत हा प्रबंध त्यांना पूर्ण करता आला नाही.

❒

## स्वातंत्र्याच्या संग्रामातील सहभाग

मराठी फायनल ची परीक्षा दिल्यानंतर वेंगुर्ल्याच्या रांगणेकर हास्कूलमून नाथ पै यांनी एका वर्षात इंग्रजीच्या तीन इयत्तांचा अभ्यासपूर्ण केला. या शाळेबद्दल नाथ यांच्या मनात अपार आस्था होती. आपल्यामध्ये देशप्रेम व क्रांतिकार्याबद्दल आस्था या शाळेने निर्माण केली असे नाथ अभिमानाने सांगत असत. राष्ट्रप्रेमाची ज्योत अशाप्रकारे बालवयात विद्यार्थीदशेंत नाथच्या मनात या शाळेने रूजविली होती. बेळगावला गेल्यावर नाथचा संबंध यागळी घराण्याशी आला. याळगी यांचे घराणे स्वातंत्र्याच्या चळवळीत आघाडीवर होते. कर्नाटक केसरी गंगाधरराव देशपांडे यांचे कै. गोविंदराव याळगी उजवे हात म्हणून ओळखले जात. लोकमान्य टिळकांच्या वेळेपासून गोविंदराव याळगी सक्रिय राजकारणात होते. त्यांचे बंधू कृष्णराव व जीवनराव हेही स्वातंत्र्याच्या चळवळीत सक्रिय होते. याळगी कुटुंबीयांच्या सहवासामुळे बेळगावात नाथचे नाते स्वातंत्र्य संग्रामाशी जुळले गेले.

इंटरच्या परीक्षेसाठी नाथ पै यांनी १९४२ साली पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्यांना र. वि. पंडित, ग. प्र. प्रधान यांच्यासारखे स्वातंत्र्याच्या विचाराने भारवलेले सहकारी लाभले. बेचाळीसचा तो काळ स्वातंत्र्याच्या चळवळीचा सुवर्णकाळ होता. सारा देश स्वातंत्र्याच्या भावनेने पेटून उठला होता. नाथही स्वातंत्र्याच्या भावनेने अस्वस्थ झाले होते. स्वातंत्र्याच्या लढ्यात झोकून घेण्यासाठी नाथचे मन अधीर झाले होते. कॉलेजला रामराम ठोकून नाथने बेळगांव गाठले. नाथचे सर्व सहकारी बेळगांवात होते.

७ ऑगस्ट १९४२ रोजी अखिल भारतीय काँग्रेस समितीचे अधिवेशन मुंबईला गवालिया टंक मैदानावर सुरू झाले. ८ ऑगस्ट १९४२ रोजी या ऐतिहासिक अधिवेशनात महात्मा गांधींनी ‘भारत छोडो’चा ठराव मांडून ब्रिटिशांनी भारतातून निघून जाण्याची नोटीस दिली. ९ ऑगस्टपासून देशभर काँग्रेसचे नेत आणि कार्यकर्त्यांना गजाआड केले गेले. ९ ऑगस्टला बेळगांवला सभा घेण्याचा प्रयत्न केल्याबद्दल नाथचे मोठे बंधू भाऊ पै आणि

सहकारी अरविंद याळगी यांना अटक झाली नाथ भूमिगत झाले आणि स्वातंत्र्यासाठी काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचे त्यांनी संघटन सुरू केले. भूमिगत कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करून लढा अधिक तीव्र करण्याचे कार्य नाथ पै यांनी त्या काळात केले.

नाथचे वय त्यावेळी जेमतेम १९-२० वर्षांचे होते. त्या वयात जीवावर उदार होऊन नाथ जी काम करीत असे त्यामुळे नाथच्या आईला नाथबद्दल अतिशय काळजी वाटायची. मायेने जपलेला, वाढवलेला तिचा लाडका राजा जीवावर उदार होऊन स्वातंत्र्यासाठी झगडतो आहे हे पाहून नाथच्या आईचे मन व्याकुळ न होते तरच नवल. आंतरिक तळमळीने त्या एकदा नाथला म्हणाल्या, "राजा तू अजून लहान आहेस. थोडासा विचार करून सांभाळून वागत जा."

पण नाथला स्वातंत्र्याचा कैफ होता. धुंदी होती. नाथने उत्तर दिले, "आई तू माझी एकटीच आई नाहीस. मला अशा आणखी वीस कोटी आया आहेत. म्हणून हे काम मला केले पाहिजे." यावर नाथची आई काय बोलणार? तिने तोंड बाजूला केले आणि डोळ्यातील अश्रू पुसले.

नाथचे मोठे बंधू भाऊ पै आणि अरविंद याळगी शिक्षा भोगून सुटून आले आणि भूमिगत चळवळीत सहभागी झाले. गजानन याळगी आणि त्यांच्या सहकाऱ्यांची एक तुकडी तर नाथ व त्याच्या सहकाऱ्यांची दुसरी तुकडी. नाथचे रामचंद्र ऊर्फ भाऊ व श्याम हे दोन बंधू भूमिगत कार्यात सहभागी झाले होते. भाऊ हा वयाने नाथपेक्षा मोठा; पण मोठा असूनही भरतासारखी धाकट्या भावाची भूमिका स्वीकारून भाऊने अखेरपर्यंत नाथची सेवा केली. त्या वयात नाथ अनेक धाडसाची कामे करी. ब्रिटिशांच्या सत्तेला फार मोठा हादरा भूमिगतांच्या या दोन तुकड्यांनी त्या काळात बेळगांवच्या परिसरांत दिला होता आणि सरकारी अधिकाऱ्यांना सळो का पळो करून सोडले होते.

बेचाळीसच्या भूमिगत आंदोलनात समाजवादी कार्यकर्त्यांबरोबर अनेक गांधी कार्यकर्तेही सहभागी झाले होते. गांधीवादी कार्यकर्ते अहिंसेबाबत आग्रही असत. समाजवादी कार्यकर्ते अहिंसेबाबत फारसे आग्रही नसत. त्यामुळे हिंसा-अहिंसेचा वाद निर्माण झाला होता. हा वाद मिटविण्याच्या दृष्टीने विचारविनिमय करण्यासाठी दोन्ही गटांची संयुक्त बैठक झाली. या बैठकीत

बरीच गरमागरम चर्चा झाली. दोन गट पडून आंदोलनात खीळ पडणार की काय असा संभ्रम निर्माण झाला होता. यावेळी नाथ पै यांनी सर्वांना स्वातंत्र्य लढ्यावर लक्ष केंद्रित करण्याचे आवाहन केले आणि पिस्तुल अथवा अन्य शस्त्रास्तेर भूमिगतांनी स्वरक्षणार्थ वापरावी; पण या शस्त्रास्त्रांनी कुणाचा वध होऊ न देण्याचे बंधन पाळावे असा पर्याय सुचविला. सर्वांना नाथची ही सूचना पसंत पडली. त्यामुळे फूट टळली आणि ऐक्य टिकले.

त्यानंतर दोन्ही गटांच्या सहकार्याने सावंतवाडीहून मोटारीने आलेले टपाल लुटण्यात आले. बेळगांवला शहापूर भागांत भूमिगताच्या एका गटाने बॉम्बचा कारखाना सुरू केला होता. या गटाशीही नाथने संपर्क साधला होता. भूमिगतांनी लावेली बुलेटिन्स पोलीस फाडून टाकीत; तेव्हा बुलेटिन्सच्या मागे छोटा बॉम्ब ठेवण्याची शक्कल काढण्यात आली. बुलेटिन फाडतांना छोट्या बॉम्बचा स्फोट होऊन पोलिसांचे हात भाजत असत.

नाथ आणि त्यांच्या तुकडीने त्या काळांत एक मोठे धाडशी कार्य केले. बेळगांवला भारतीय लष्कराचा कॅम्प होता (आजही आहे). या कॅम्पमध्ये मिलिटरीचा डेअरी होता. डेअरीवर दूध पुरविण्यासाठी दुभत्या जनावरांचे मोठे गोठे होते आणि जनावरांचे खाद्य म्हणून कँपमध्ये गवताच्या प्रचंड गंजी होत्या. या गंजी पेटविण्याचा धाडसी निर्णय नाथच्या गटाने घेतला. मिलिटरीच्या जागत्या पहाऱ्यातून हे करणे सहजसाध्य नव्हते. पण मिलिटरीचा पहारा केव्हा सैल होतो हे नाथच्या गटातील कार्यकर्त्यांनी अचूक हेरून ठेवले होते आणि संधी साधून एका अंधाऱ्या रात्री सर्व गंजी पेटविण्यात यशस्वी झाले. गंजी पेटविणाऱ्यापैकी कोणीही पहाऱ्यावरील मिलिटरी जवानांच्या व पोलिसांच्या हाती सापडले नाहीत, इतक्या बेमालूमपणे हे कार्य नाथच्या गटाने तडीस नेले.

नगर जिल्ह्यातील लक्ष्मीवाडी येथील व्याख्यानांत नाथ पै यांनी बेचाळीसच्या आंदोलनातील बेळगांवच्या परिसरातील त्यांच्या कार्याची माहिती स्वतः सांगितली. त्या सभेत बोलताना नाथ पै म्हणाले, “एकोणीसशे बेचाळीस साली बेळगांवच्या पोलीस चौकीवर मी आणि माझ्या मित्रांनी हल्ला केला. १९४२च्या लढ्यामध्ये बेळगांवच्या परिसरातील ब्रिटिशांची जा सत्ता होती, तिचा मागमूससुद्धा आम्ही नष्ट करून टाकला होता. मी आणि माझे बंधू,

आमचे मित्र यांच्यावर वेगवेगळे अठरा खटले भरण्यात आले होते. त्यात अत्यंत महत्त्वाचा खटला होता तो बेळगांवच्या पोलीस चौकीवर आम्ही हल्ला केला होता त्याचा. ११ मार्च १९४३ला ते ताब्यात घेतलं होतं आणि ते जाळलं होतं. त्यानंतर आम्ही पकडले गेलो. पकडले गेल्यानंतर फार छळवाज करण्यात आला. सगळ्यात शेवटी मला पकडण्यात आले होते. पण माझ्यापूर्वी जे पकडले गेले ते बिचारे गरीब होते; पण अतिशय तेजस्वी करूण मुले होती. एका मुलाला नऊ तास मारण्यात आलं होतं आणि शेवटी पहाटेला त्याला उलट टांगण्यात आलं. नागवा करून पहाटेला पायाला दोरी बांधून त्याला ज्यावेळी उलटा टांगून चपलांनी झोडपण्यास सुरूवात केली त्यावेळी मार असह्य होऊन त्याने कबुली, “आम्हीच पोलीस चौकी जाळली, नाथ पैच आमचे प्रमुख होते.” असे सांगून पोलिसांचे ड्रेस ठेवलेली जागा आणि शस्त्रास्त्रे टाकलेल्या जागा त्याने पोलिसांनी दाखविल्या.

त्यानंतर नाथ पै यांनाही अटक झाली. अटक झाल्यावर त्यांना इतकी मारहाण झाली होती की उपचारार्थ हॉस्पिटलमध्ये दाखल करावं लागलं होतं. नाथवरील पोलीस चौकी जाळल्याबद्दलचा खटला आय्.सी.एस्. अधिकारी पुरूषात्तम मंगेश लाड यांच्यासमोर चालला होता. या खटल्यात सरकार पक्षाच्यावतीने सिव्हिल सर्जनची साक्ष काढण्यात आली होती. सिव्हिल सर्जनने आपल्या साक्षीत सांगितले की, या तरूणाला ज्यावेळी आमच्या हॉस्पिटलमध्ये आणले त्यावेळी छातीमध्ये कळा येत होत्या असं तो सांगत होता आणि डाव्या छातीजवळ कशानं तरी मारलं असावं असे वण दिसत होते. जखम नव्हती. परंतु काळा डाग दिसत होता. आम्ही त्याला ‘अंजिआना पेक्टोरिस’ (Angina Pectoris) म्हणतो. या आजाराकरिता म्हणजे हृद्रोगाकरिता औषधोपचार केला.”

यावर जज्ञनी विचारलं, “तुम्ही त्याला नीट तपासलं होतं का?”

सिव्हिल सर्जन म्हणाले, “हो.”

जज्ञनी परत विचारले, “वयाच्या अठराव्या वर्षी ‘अंजिआना पेक्टोरिस’ होणं संभव असतं का?”

सिव्हिल सर्जन उत्तरले, “अशक्य असतं.”

सिव्हिल सर्जनच्या साक्षीवरून पोलिसांनी मारलं, या नाथ पै यांच्या म्हणण्याला पुष्टी मिळाली. सिव्हिल सर्जनच्या साक्षीवरून जळीताच्या खटल्यातील आरोपींना जज्जसाहेबांनी दोषमुक्त केले.

तुरुंगात रवानगी झाल्याने पोलिसांच्या मारातून नाथची सुटका झाली खरी; पण तुरुगातही जेलरचा लाच नाथच्या वाट्याला आला. बेचाळीसच्या आंदोलनाच पकडलेल्या कार्यकर्त्यांना खूप छळण्यात येत असे. सुंद्री आणि भरमाप्पा हे मारहाणीचे त्या काळातील अमानुष प्रकार होते. सुंद्री म्हणजे वेताची छडी. मिठाच्या पाण्यात ती भिजत ठेवण्यात येई. संशयावरून पकडलेल्या स्वातंत्र्यसैनिकांनी या छडीने फोडण्यात येत असे. अंगातून रक्त बाहेर पडे आणि मीठाचे पाणी त्या रक्तात मिसळे आणि मग शरीराची आग होई. भरमाप्पा हा आणखी एक भयंकर प्रकार. गांवठी बांधणीच्या वहाणा मिठाच्या पाण्यात भिजत ठेवल्या जात. या वहाणांना नाल मारलेले असत. या वहाणांना भरमाप्पा म्हणत! या भरमाप्पाने झोडपले की मी मी म्हणणाऱ्यांची गाळण उडत असे. या सुंद्री व भरमाप्पाने स्वातंत्र्य सैनिकांना अमानुषपणे बडवीत असत. या मारहाणीने अनेकजण कायमचे जायबंदी झाले. जबर मारहाणीने निरपराधीही न केलेले गुन्हे कबूल करीत. पण कोर्टात पुढे ते टिकत नसत.

नाथ तुरुंगात आले आणि पूर्वी तुरुंगात आलेल्या राजबंद्यांना मोठा आधार मिळाला. तुरुंगातील अधिकाऱ्यांशी नाथ बेडरपणे बोलत असे. तुरुंगातील जेवण अत्यंत वाई असे. भाकरीत रेती असे तर भाजी बेचव असे. तुरुंगात दिले जाणारे अन्न कशा प्रकारचे असावे हे पाहाण्यासाठी समिती असे. या कमिटीवर गावातील काही प्रतिष्ठित नागरिकही असत. एकदा ही कमिट भेट द्यायला आली होती. नाथने जेलमध्ये त्यांना दिले जाणारे कदान्न दाखविले आणि आम्ही काय पशू आहोत काय असा खडा सवाल कमिटीला विचारला आणि भारकी त्यांच्यापुढे करून भाकरी खाऊन दाखविण्याचे आव्हान दिले. कमिटीचे सभासद खजिल होऊन परत गेले. नाथने जेलमधील राजबंद्यांना आणि कैद्यांना निर्भय बनविले. नाथच्या या उद्योगाने जेलचे अधिकारी अस्वस्थ झाले. त्यांनी नाथला इतर राजबंद्यापासून अलग करण्यासाठी नाथची रवानगी हिंडलगा जेलमध्ये केली. तिथेही इतर

राजबंद्यापासून नाथला अलग ठेवण्यासाठी अंधार कोठडीत डांबून ठेवण्यात आले होते.

रावसाहेब पटवर्धन, अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे आदि ज्येष्ठ काँग्रेस नेत्यांना त्यावेळी हिंडलगा तुरुंगात ठेवण्यात आले होते. नाथला अंधार कोठडीत एकाकी ठेवण्यात आले असल्याचे रावसाहेब पटवर्धन यांना कळताच तेही अस्वस्थ झाले. नाथची जेलमधील अंधार कोठडीतून सुटका करण्यासाठी रावसाहेब पटवर्धन यांनी निकराचे प्रयत्न केले. शेवटी रावसाहेब पटवर्धन यांनी नाथला इतर राजबंद्यासोबत न ठेवता आपल्यासमवते ठेवावे या शर्तीवर अकरा महिन्यानंतर नाथ पै यांची तुरुंगाच्या अधार कोठडीतून सुटका झाली आणि तुरुंगात रावसाहेबांच्या सान्निध्यात राहायला मिळाले. हा नाथचा खरा फायदा झाला.

अमेरिकेने जपानमधील हिरोशिमा आणि नागासाकी नगरावर अणुबाँब टाकल्याने दुसऱ्या महायुद्धाचा शेवट झाला. त्यानंतर ब्रिटनमध्ये झालेल्या निवडणुकींत मजूर पक्ष सत्तेवर आला. मजूर पक्षाचे अनेक नेते भारताला स्वातंत्र्य देण्यास अनुकूल होते. भारताच्या स्वातंत्र्याच्या वाटाघाटी सुरू झाल्या आणि राजबंद्यांची सुटका करण्यात आली. नाथ पै आणि त्यांच्या सहकाऱ्यांचीही सुटका झाली.

१५ ऑगस्ट १९४७ रोजी ब्रिटीशांच्या अंमलाखालील भारत मुक्त झाला; तरी पोर्तुगालच्या ताब्यातील गोवा, दीव, दमण आणि दादरा नगरहवेली तसेच फ्रान्सच्या ताब्यातील पाँडेचरी हे प्रदेश मुक्त झाले नव्हते. कालांतराने ब्रिटीशांप्रमाणे पाँडेचरीवरील सत्ता फ्रान्सने सोडून दिली. पण पोर्तुगालचा हुकूमशहा सालाझार सहजासहजी सोडणे शक्य नव्हते. आपल्या सत्तेविरुद्ध या प्रदेशांत उठाव होऊ न देण्याची दक्षता या प्रदेशांतील रहिवाशांचे नागरिक हक्क हिरावून घेऊन सालाझारशाहीने घेतली होती.

ज्येष्ठ समाजवादी नेते बेचाळीसच्या भूमिगत आंदोलनाचे प्रमुख सूत्रधार डॉ. राम मनोहर लोहिया यांची १९४६ साली तुरुंगातून सुटका झाल्यावर ते काही दिवस विश्रांतीसाठी गोव्यात आपल्या एका मित्राकडे राहायला गेले होते. लोहियांच्या गोव्यातील वास्तव्यात गोवा काँग्रेसचे नेते डॉ. लोहियांना भेटले. गोव्यातील राजकीय परिस्थितीची माहिती त्यानी लोहियांना दिली.

साधे नागरिक हक्कही गोमंतकीयांना नाकारण्यात आले होते. ना भाषण-स्वातंत्र्य, ना मुद्रण स्वातंत्र्य, ना संघटना-स्वातंत्र्य, ना मिरवणुकीचे स्वातंत्र्य, मराठी वृत्तपत्रांना एक स्तंभ मराठीत तर एक स्तंभ पोर्तुगीज भाषेत छापावा लागे. अधिकाऱ्यांच्या पूर्वसंमतीशिवाय कोणताही मजकूर छापता येत नसे. गोवा काँग्रेसच्या नेत्यांनी दिलेल्या माहितीने स्वातंत्र्यवीर डॉ. लोहिया अस्वस्थ झाले. त्यानी मडगांवला जाहीर सभा घेण्याचे ठरविले. ठरल्याप्रमाणे १८ जून १९४६ रोजी डॉ. लोहियांनी मडगांवला जाहीर सभा घेऊन गोव्याच्या स्वातंत्र्यलढ्याची ज्योत प्रज्वलित केली. लोहियांनी पोर्तुगीज पोलिसांनी अटक करून हद्दपार केले.

बाहेर आल्यावर डॉ. लोहिया महात्मा गांधीना भेटले. गोवा प्रश्नासंबंधी गांधीजींशी चर्चा केली आणि गोव्याचा लढा अधिक तीव्र करण्यासाठी परत आले. बेळगांवच्या स्टेशनवर नाथ पै यांच्या नेतृत्वाखाली सेवादल सैनिकांनी प्रचंड स्वागत केले. डॉ. लोहियांनी गोव्यात परत सभा घेण्याचा प्रयत्न करताच त्यांना अटक करून पांच वर्षांच्या कालावधीसाठी गोव्यातून हद्दपार करण्यात आले.

डॉ. लोहियानी काही काळ बेळगांवला वास्तव्य करून गोव्याच्या लढ्याला मार्गदर्शन केले. डॉ. लोहिया आणि नाथ पै यांनी गोव सरहद्दीचा संयुक्त दौरा करून सरहद्दीवरील प्रमुख गावांतून जाहीर सभा घेऊन वातावरण निर्मिती केली. नाथ पै यांच्या नेतृत्वाखाली सर्वश्री बळवंत दीक्षित, वासू देशपांडे, राम देशपांडे, गोविंद वालावलकर, दत्ता मुतकेकर, जनार्दन सावंत, नारायण शेट्ये, परशुराम शहापूरकर, मल्लेश जुवेकर, एस्. आर्.गावंडळकर आदि सेवादल कार्यकर्त्यांनी गोव्यात जनजागरणाचे आणि संघटनात्मक बांधणीचे काम सुरू केले.

नाथनी गोव्याच्या खेडोपाडी स्वातंत्र्याचा संदेश पोचविला. नाथ स्वतः हातात एक थाळी व लाकडी ठोकळा घेत. गावात मोक्याच्या जागी थाळी वाजवीत. गर्दी जमली की नाथचे भाषण सुरू होई. नाथ स्वातंत्र्याचे महत्त्व पटवून देत. नाथच्या भाषणाने लोक प्रभावीत होत. सभा संपली की सायकलवर स्वार घेऊन दुसरा गाव गाठीत. रात्रौच्या वेशी पोस्टर्स लावण्याचे

काम करीत. नाथ आणि त्याच्या सहकाऱ्यांनी पोलिसांना सळो की पळो करून सोडले होते.

१५ ऑगस्टला भारत स्वातंत्र्य झाल्यावर पोर्तुगाल आणि फ्रेंचांच्या ताब्यातील भारतीय प्रदेश मुक्त होईल आणि नवीन भारत सरकार हा प्रश्न अधिक सुलभ रीतीने सोडवू शकेल असे गांधींजींचे मत होते. महात्माजींनी आपले हे मत डॉ. लोहियांना कळविले. गोव्याच्या स्वातंत्र्याचा लढा गोमंतकीयांनी चालवावा असे पंडित जवाहरलाल नेहरू आदी काँग्रेसच्या नेत्यांची भूमिका होती. महात्माजींच्या शब्दाला मान देऊन डॉ. लोहियांनी गोव्यात काम करणाऱ्या गोव्याबाहेरच्या कार्यकर्त्यांना परत बोलविले. बेळगांवहून गोव्यात गेलेले कार्यकर्ते बाहेर आले आणि पुन्हा राष्ट्र सेवादलाच्या कामाला लागले. नाथला आणि त्यांच्या सहकाऱ्यांना हा निर्णय मुळीच आवडला नाही. तरीही परिस्थितीमुळे त्यांना तो मान्य करावा लागला. पण नाथचा गोवा मुक्ती आंदोलनाशी संबंध पुढेही चालू राहिला.

कारवारच्या गोमंतक साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांत समाजवादी नेते आणि ज्येष्ठ साहित्यिक मा.ना.ग.उर्फ नानासाहेब गोरे यांनी पुढील गोमंतक साहित्य संमेलने गोव्यातच भरविली जावीत आणि सालाझारची गोव्यातील जुलमी राजवट संपुष्टात आणण्यासाठी भारतीयांना गोवा मुक्ती आंदोलनात सहभागी होण्याचे आवाहन केले. गोवा नॅशनल काँग्रेसच्या अध्यक्षपदी याचवेळी समाजवादी नेते श्री. पीटर अल्वारीस यांची निवड झाली होती. पुण्यात सर्वपक्षीय गोवा विमोचन समिती स्थापन झाली. काँग्रेसच्या नेते केशवराव जेधे या समितीचे अध्यक्ष होते. दैनिक केसरीचे संपादक लोकमान्य टिळकांचे नातू जयंतराव टिळक या समितीचे सचिव होते. समितीच्या शाखा बेळगांव, सावंतवाडी, कारवार, बांदा, सातार्डा, दोडामार्ग आदि गोवा सरहद्दीवरली प्रमुख गावातूनही निर्माण झाल्या.

गोवा नॅशनल काँग्रेस आणि गोवा विमोचन समितीच्यावतीने १५ ऑगस्ट १९५४ रोजी गोवा मुक्ती आंदोलनातील सत्याग्राही पर्वाला सुरवात झाली. नाथ पै बॅरिस्टरची पदवी संपादन करून याच सुमाराला भारतात परतले होते. गोवा मुक्ती आंदोलनातील सत्याग्रहीपर्वाला भारताच्या सर्व भागातून अभूतपूर्व प्रतिसाद मिळाला. नाथनेही या सत्याग्रहात कॅसलरॉक येथे सत्याग्रही

तुकडीचे नेतृत्व करून गोव्याहून येणारी रेल्वेगाडी सहा तास रोखून धरली होती. शेवटी नाथसह सर्व सत्याग्रहींना अटक करून रेल्वेचा मार्ग मोकळा करण्यात आला.

१५ ऑगस्ट १९५५ रोजी गोवा मुक्तीसाठी सामुदायिक सत्याग्रहाचे आयोजन करण्यात आले होते. नाथ त्यावेळी "इंटर नॅशनल युनियन ऑफ सोशालिस्ट युथस्" या संस्थेचे अध्यक्ष होते. गोवा सत्याग्रहात भाग घेण्यासाठी आंतरराष्ट्रीय युवकांची एक तुकडी तयार करण्याचे नाथने ठरविले होते. युरोपातील देशोदेशीचे समाजवादी युवक या सत्याग्रही तुकडीत सहभागी होण्यास तयार झाले होते. बायरन या इंग्लिश कवीने ग्रीसच्या मुक्तेसाठी अशीच युरोपियन युवकांची तुकडी नेली होती. परंतु भारत सरकारने अशी आंतरराष्ट्रीय सत्याग्रहींची तुकडी नेण्यास परवानगी नाकारली. त्यामुळे नाथची फार निराशा झाली.

पोर्तुगालने आणि वसाहतवादाच्या पुरस्कर्त्यांनी युरोपांत गोव्याच्या प्रश्नावरून भारताविषयी अपप्रचार चालविला होता. नाथ आंतरराष्ट्रीय समाजवादी युवक संघटनेचा पहिला भारतीय अध्यक्ष होता. या संघटनेच्या कामाच्या निमित्ताने त्याने युरोपातील अनेक देशांचा दौरा केला. या दौऱ्यात गोव्यासंबंधी तेथील वृत्तपत्रांतून लेख लिहून व मुलाखती देऊन गोव्याच्या स्वातंत्र्य लढ्याची माहिती तेथील लोकांना दिली. गोवा हा भारताचा भौगोलिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या अविभाज्य घटक आहे. तो पोर्तुगालची वसाहत होऊ शकत नाही. ही वस्तुस्थिती नाथने तेथील लोकांना पटवून दिली. युरोपमधील अनेक संघटनांच्या प्रमुखांना नाथ पै भेटले. युरोपांत अनेक देशांतून पोर्तुगीज वकालतीसमोर पोर्तुगालच्या वसाहतवादी धोरणाविरुद्ध निदर्शने घडवून आणली. ब्रिटीश लेबर पार्टी, डच लेबर पार्टी, जर्मनी, स्वीडन, फिनलँड आदी देशातील सोशल डेमॉक्रेटिक पक्ष नार्वेजियन लेबर पार्टी, सोशालिस्ट इंटर नॅशनल आदी अनेक संघटनांच्या प्रमुखांनी गोव्याच्या स्वातंत्र्यलढ्याला पाठिंबा व्यक्त केला होता. इंग्लडच्या राणीने या प्रश्नात मध्यस्थी करावी असे सुचविणारा ठराव मजूर पक्षाच्या काही खासदारांनी ब्रिटिश पार्लमेंटकडे पाठविला होता. गोव्याच्या जनतेला आपले भवितव्य ठरविण्याची संधी मिळावी असे वातावरण निर्माण करण्याची मागणी या

ठरावात करण्यात आली होती. नाथच्या प्रयत्नांनी फ्रेन्नर बॉकवे, रेजिनाल्ड, ॲन्थनी वेजवुड बेन आदी मंडळींनी गोव्याच्या प्रश्नात भारतीयांना मदत करण्यासाठी समितीही स्थापन झाली होती. या समितीने आंतरराष्ट्रीय क्षेत्रात गोव्याच्या लढ्याला मान्यता मिळवून देण्याची मोलाची कामगिरी बजाविली. नाथ पै यांचे हे कार्य भारताला लष्करी कारवाई करून गोवा भारतात सामील करून घेण्यास उपयुक्त ठरले.

❒

## असामान्य संसदपटू

१९५७ साली भारताच्या लोकसभेच्या दुसरी सार्वत्रिक निवडणूक जाहीर झाली. संयुक्त महाराष्ट्र समितीने मराठी भाषिक प्रदेशातील सर्व लोकसभेच्या आणि राज्य विधान सभेच्या जागा लढविण्याचा निर्णय घेतला होता. संयुक्त महाराष्ट्र समितीमध्ये काँग्रेस सोडून सर्व विरोधी पक्ष सामिल झाले होते. जागा वाटपाच्या संदर्भात १९५२ साली काँग्रेसच्या विरोधात ज्या मतदारसंघात काँग्रेसच्या खालोखाल दुसऱ्या क्रमांकाची मते ज्या पक्षानी मिळविली होती त्या पक्षांनी त्या जागा लढवाव्या याबाबत संयुक्त महाराष्ट्र समितीमध्ये एकवाक्यता झाली होती. दक्षिण रत्नागिरी (राजापूर) लोकसभा मतदारसंघ हा क्रमाने लोकसभेचा भारतातील एक क्रमांकाचा मतदारसंघ आहे. १९५२च्या निवडणुकीत या मतदारसंघातून समाजवादी पक्षाचे उमेदवार साथी श्री. ना. ग. ऊर्फ नानासाहेब गोरे यांना दुसऱ्या क्रमांकाची मते मिळाली होती. त्यामुळे हा मतदारसंघ समाजवादी पक्षाच्या वाट्याला आला होता. समाजवादी पक्षातर्फे या मतदारसंघातून ना. ग. गोरे अगर बॅ. नाथ पै यांना उमेदवारी द्यावी असे ठरले होते. पण नानासाहेब गोरे यांनी पुणे शहर मतदारसंघातून निवडणूक लढविण्याचा निर्णय घेतल्याने दक्षिण रत्नागिरी म्हणजे राजापूर लोकसभा मतदारसंघातून समाजवादी पक्षातर्फे बॅ. नाथ पै यांची उमेदवारी निश्चित झाली.

### तो आला, बोलला आणि जिंकून गेला

राजापूर मतदारसंघातून कोकणातील काँग्रेसचे ज्येष्ठ नेते ॲड. मोरोपंत जोशी यांची उमेदवारी निश्चित झाली होती. १९५२ साली लोकसभेच्या पहिल्या निवडणुकीत त्यांचीच या मतदारसंघातून लोकसभेवर निवड झाली होती. निवडणूक प्रचाराबाबत बॅ. नाथ पै यांनी प्रथमपासून काही पथ्ये पाळली होती. त्यांतील पहिले पथ्य होते, प्रतिस्पर्धी उमेदवाराला कमी लेखायचे नाही. त्यांच्याविशयी आदराची भावना ठेवायची आणि व्यक्तिगत टीका अगर अपप्रचार करायचा नाही. चारित्र्यहनन तर अजिबात करायचे नाही. आपल्या सर्व निवडणूक प्रचारांत नाथ पै यांनी ही पथ्ये कटाक्षाने पाळली. ॲड. मोरोपंत

जोशी यांच्यासारख्या स्वातंत्र्यसंग्रामात सक्रिय भाग घेतलेल्या काँग्रेसजनाविषयी त्यांच्या मनात नितांत आदर असे. निवडणूक प्रचारात नाथ पै ॲड. मोरोपंत जोशींचा नेहमी गौरवाने उल्लेख करीत. पण त्याचबरोबर ते इतर भाषिकांना जो न्याय दिला तो न्याय मराठी भाषिकांना नाकारला जात आहे, मराठी भाषिकांवरील या अन्यायाच्या निवारणार्थ आणि मराठी भाषिकांचे संयुक्त महाराष्ट्र राज्य निर्माण व्हावे यासाठी संयुक्त महाराष्ट्र समितीच्या उमेदवारांना विजयी करण्याचेही आवाहन करीत. नाथच्या भाषणाने मतदार मंत्रमुग्ध होत असत. तो आला, बोलला आणि त्याने मतदारांची मने आणि मते जिंकली हे नाथच्या बाबतीत अक्षरशः खरे ठरले. नाथच्या हयातीत १९५७, १९६२ आणि १९६७ या लोकसभेच्या तिन्ही निवडणुकीमध्ये राजापूर लोकसभा मतदारसंघातील मतदारांनी भरघोस मतांनी विजयी करून आपला प्रतिनिधी नाथ पै यांना लोकसभेत पाठविले. १९५७ ते १७ जानेवारी १९७१ पर्यंत सलग चौदा वर्षे बॅ. नाथ पै यांनी या मतदारसंघाचे प्रतिनिधीत्व केले. पण एकदा खासदार म्हणून निवडून आलेला प्रतिनिधी केवळ त्या मतदारसंघाचा अगर राज्याचा प्रतिनिधी राहात नाही तर तो देशाचा-भारताचा प्रतिनिधी होतो याचे भान राखून नाथ पै यांनी खऱ्या अर्थाने भारताचा प्रतिनिधी म्हणून लोकसभेत काम केले. लोकसभेत वेळोवेळी राष्ट्राच्या विविध प्रश्नांवर त्यांनी सडेतोडपणे आणि समतोलपणाने भाष्य केले.

लोकसभेत प्रवेश केल्यावर लोकसभेच्या पहिल्या अधिवेशनातच नाथ पै यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा लोकसभेवर उमटविला होता. पत्रकार आणि संसदेचे समीक्षक यांचे लक्ष्य त्यांनी वेधून घेतले होते. ‘नवभारत टाईम्स’च्या दिल्ली आवृत्तीमध्ये त्यांच्या संसद समीक्षकाने दिनांक १४/८/१९५७च्या अंकात बॅ. नाथ पै यांच्या वक्तव्याची पुढील शब्दांत नोंद घेतली होती.

“ते बोलू लागले की संगीताच्या ध्वनिलहरीच उमटत असल्याचा भास होतो. एरवी त्यांच्या मताशी सहमत नसलेले लोकही प्रभावीत होतात. लोकसभेच्या गेल्या अधिवेशनात ते जेव्हा जेव्हा बोलल तेव्हा तेव्हा लोकसभा मंत्रमुग्ध होत असे.”

श्री. के. ईश्वरदत्त यांची त्या काळात संसदेच्या क्षेत्रातील जाणकार आणि समीक्षक म्हणून ख्याती होती. त्यांनी 'ट्रिब्यून' या नियतकालिकात 'संसदीय वक्तृत्व' या शीर्षकाखाली लिहिलेल्या लेखांत म्हटले आहे की, "केवळ वक्तृत्वाच्या बाबतीत बोलायचे तर नाथ पै यांच्या वक्तृत्वाच्या तोडीचे समाजवादी पक्षातच काय पण हिरेन मुखर्जी यांचा अपवाद वगळता लोकसभेत आढळणे मुष्कील आहे."

## वक्ता दशसहस्त्रेषु

बॅ. नाथ पै यांनी आपल्या चौदा वर्षांच्या लोकसभेतील कालवधीमध्ये आपल्या व्यक्तिमत्त्वाचा अविस्मरणीय ठसा भारताच्या सार्वभौम लोकसभेवर उमटविला होता. महाराष्ट्रातील ज्येष्ठ समाजवादी विचारवंत आणि श्रेष्ठ साहित्यिक श्री. ना. ग. तथा नानासाहेब गोरे यांनी नाथ पै यांना "वक्ता दशसहस्त्रेषु" अशी उपाधी बहाल केली आहे. बॅ. नाथ पै यांचे मराठीतून पहिले चरित्र लिहिणारे त्यांचे सहकारी श्री. वासू देशपांडे यांनी बॅ. नाथ पै यांच्या निवडक भाषणांचा संग्रह 'लोकशाहीची आराधना' या नावाने प्रकाशित केला आहे. या पुस्तकात लिहिलेल्या प्रस्तावनेत श्री. ना. ग. गोरे म्हणतात, "नाथ पै यांच्या आवाजात एक कमावलेले मार्दव असे. त्यांच्या वाणीला विलक्षण वेग होता, धार होती. मला पुष्कळदा वाटते की, नाथ पै अव्वल दर्जाचे गायक बनले असते इतके त्यांचे भाषण गायनाच्या रंगढंगाचे भासे. खर्जापासून तार-सप्तकापर्यंतचे चढउतार त्यांच्या भाषणात येऊन जात. त्यामध्ये लय असे, खटके असत, पलटे असत. इतक्या सुरेल व हुकमी आवाजाचा वक्ता नामदार श्रीनिवास शास्त्रींच्यानंतर मी ऐकला तो नाथ पैच."

१९५७ ते १९६२ या कालावधीत समाजवादी नेते ना. ग. गोरे लोकसभेचे सभासद होते. लोकसभेतील बॅ. नाथ पै. यांच्या भाषणाविषयी 'लोकशाहीची आराधना' या नाथ पै यांच्या भाषणांच्या मराठीतील संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत श्री. ना. ग. गोरे लिहितात, "संसदेमध्ये बोलायचे असले की नाथ पै किती तयारी करीत असत ते मी पाहिलेले आहे. आपल्या अतिशय गचाळ अक्षरांत त्यांनी केलेल्या भाराभर टिपण्या त्यांच्या फायलीत भरलेल्या असत. भाषणासाठी ते संदर्भ पाहून ठेवीत, पुरावे गोळा करीत. पण एवढ्यावरच ते

थांबत नसत. एखादे संस्कृत वचन, एखादे फ्रेंच अगर इंग्रजी वाक्य, एखादा चपखल विनोदी चुटका अशी सगळी आयुधे घेऊन ते सभागृहात येत. त्यांची स्मरणशक्ती प्रखर होती. ते नेहरुंना उद्‌धृत करू लागले तर नेहरुच बोलताहेत असे वाटावे, आचार्य अत्र्यांचा किस्सा सागू लागले तर ते आचार्यांचा आवाज ते ऐकवीत आणि इंदिराजींना आपणच तर नाथ पैंच्या जागेवरून बोलत नाही ना असे भासवू शकत."

## संपाच्या हक्काचे समर्थन करणारे ऐतिहासिक भाषण

'असामान्य संसदपटू' हा किताब बॅ. नाथ पै यांना लाभला तो भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी सहकारी कर्मचाऱ्यांच्या संपाच्या संदर्भात बॅ. नाथ पै यांच्यावर केलेल्या मर्मघाती टीकेला बॅ. नाथ पै यांनी दिलेल्या सडेतोड आणि बिनतोड उत्तराने. १९६० साली झालेल्या केंद्रीय सरकारी कर्मचाऱ्यांच्या संपाचे नेतृत्व बॅ. नाथ पै यांनी केले होते. शासनाने पाशवी बळाचा वापर करून हा संप मोडून काढला होता. या संपाबाबत बॅ. नाथ पै यांनीच लोकसभेत चर्चा घडवून आणली होती. या चर्चेत भारताचे तत्कालीन पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी सरकारची बाजू मांडताना संपाच्या नेतृत्वावर अपरिपक्वतेचा आरोप करून "ज्यांना प्रत्यक्ष एखाद्या गाढवावरही बसता येत नाही ते वाघावर बसण्याची भाषा बोलतात हे आश्चर्यकारक नव्हे काय?" अशा उपहासगर्भ शब्दांत संपाच्या नेतृत्वावर टीका केली होती. या संपाला 'सामाजिक बंडखोरी' असे संबोधन करून लोकशाहीत संपाचा अधिकार असावा का? असाही प्रश्न उपस्थित केला होता.

नेहरूंच्या आक्षेपांना बॅ. नाथ पै कसे उत्तर देतात याकडे सर्वांचे लक्ष लागले होते. दुसऱ्या दिवशी नाथचे भाषण ऐकण्यासाठी लोकसभेच्या सर्व प्रेक्षक गॅलऱ्या तुडुंब भरल्या होत्या. त्या दिवशी नाथ पै यांनी लोकसभेत हातात पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या आत्मवृत्ताचीच प्रत घेऊनच प्रवेश केला. त्यांच्या वक्तृत्व शैलीचे आणि चाणाक्ष बुद्धीमत्तेचे एक वेगळे दर्शन त्या दिवशी लोकसभेत घडले. संपाच्या पूर्वी पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू

यांनी भारतातील सर्व राज्याच्या मुख्यमंत्र्यांना लिहिलेल्या पत्रातील पुढील उतारा लोकसभेत त्यांनी वाचून दाखविला.

“अशा प्रकारचे वाद मिटविण्याची योग्य अशी यंत्रणा आपण अद्याप बनविलेली नाही. सरकार अशा प्रश्नाच्या बाबतीत कासवाच्या गतीने चालत राहाते आणि समस्या विक्राळ स्वरूप धारण करून उभी राहण्यापूर्वी महिनेच कार्य वर्षे निघून जातात. जी समस्या सामंजस्य दाखवून सोडविता आली असती ती सोडविणे अधिक कठीण होऊन बसते. प्रथम नैराश्य निर्माण होते, मग भावना प्रक्षुब्ध केल्या जातात, त्यातूनच संघर्ष निर्माण होतो व त्यामुळे अखेर हीत कोणाचेच होत नाही.”

पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या पत्रातील वरील उतारा उदधृत करून नाथ पै म्हणाले, “माझेही म्हणणे तेच आहे. आपल्या देशांत जीवनाची एक शोकांतिका आहे. कितीही वेळा धडे मिळाले तरी पुरेसा दबाव आल्याखेरीज आम्ही काही करायला उद्युक्तच होत नाही मुळी.”

बॅ. नाथ पै एवढ्यावर थांबले नाहीत. पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या आत्मवृत्तामधून १९२६ साली इंग्लंडमधील कोळसा कामगारांच्या संपाला पाठिंबा देणारे पंडितजींचे विचार वाचून दाखवून बॅ. नाथ पै यांनी सवाल केला, “कोणते नेहरू खरे? १९२६ साली इंग्लंडमधील कोळसा कामगारांच्या संपाला पाठिंबा देणारे की स्वदेशातील सरकारी कर्मचाऱ्यांच्या संपाला विरोध करणारे?” असा सवाल उपस्थित करून व्यथित अंतःकरणाने “पंडित जवाहरलाल नेहरूंच्या बाबतीत आमचं एकूण चुकलंच! त्यांची शिकवण परमार्थाने स्वीकारून आमच्या कुवतीप्रमाणे आम्ही ती आचरणात आणण्याचा प्रयत्न केला आणि आम्ही फसलो” अशा उद्‌गारांनी आपली व्यथा बॅ. नाथ पै यांनी व्यक्त केली. सर्वांनी बॅ. नाथ पै यांच्या भाषणाची मुक्तकंठाने स्तुती केली. वृत्तपत्रांनी छापले, “बहुमताच्या बळावर पंडित जवाहरलाल नेहरू यांनी विजय मिळविला असला तरी प्रत्यक्षांत बॅ. नाथ पै यांनी आपल्या प्रभावी भाषणाने सर्वांची मने जिंकली आहेत.”

बॅ. नाथ पै यांचे ते भाषण म्हणजे संसदीय क्षेत्रातील भाषणाचा तो सर्वोत्कृष्ट नमुना होता. देशोदेशीच्या वृत्तपत्रानीही त्या भाषणाची स्तुती केली आणि अत्यंत समर्पक शब्दांत बॅ. नाथ पै यांनी नेहरूंना उत्तर दिल्याचे नमूद

केले. बॅ. नाथ पै त्यांच्या त्या चाळीस मिनिटांच्या भाषणांत संयम होता, समतोलपणा होता. आर्जव होते. पण त्याच्याबरोबर तत्त्वांचा आग्रह होता. त्यांचे त्या दिवशीचे भाषण म्हणजे खुमासदार वक्तृत्व आणि प्रखर विचार याचा उत्कृष्ट नमुना होता. बॅ. नाथ पै यांचे पहिले चरित्र लिहिणारे त्यांचे सहकारी श्री. वासू देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे, "पण वक्तृत्व हाच काही नाथ पैंचा एकमेव गुण नव्हता, विवेक, विचार, अव्वल दर्जाची देशभक्ती आणि समाजवादावरील गाढ निष्ठा हे सारे त्यात होते. गरीब, दीन, दलित आणि पीडित लोकांची बाजू ते नेहमी घेत याचे प्रत्यंतर म्हणजे लोकसभेतील त्यांचे ते भाषण होय."

## लोकसभेचे 'लेम-डक' अधिवेशन रद्द करण्यात यशस्वी

बॅ. नाथ पै यांनी आपल्या लोकसभेतील चौदा वर्षांच्या कालावधीत भारताच्या लोकसभेतील काही अनिष्ट प्रथा बंद करायला लावल्या; तशाच काही चांगल्या प्रथा सुरूही करायला लावल्या. त्याची दोनच उदाहरणे येथे नमून करीत आहे.

१९६७ साली लोकसभेची चौथी निवडणूक झाल्यावरही १३ मार्च १९६७ पासून दहा दिवसांचे पूर्वीच्या तिसऱ्या लोकसभेने अधिवेशन भरविण्याचा आदेश काढण्यात आला होता. हे लोकसभेचे लंगडे अधिवेशन आहे ते भरविण्यात येऊ नये असे बॅ. नाथ पै यांचे ठाम मत होते. पण पंडित नेहरुंच्या हयातीत लोकसभेचे असे लंगडे अधिवेशन भरविण्याची प्रथा पडली होती. काँग्रेस पक्ष त्या काळांत लोकसभेत प्रचंड बहुमताने निवडून येत असल्याने या अयोग्य प्रथेची त्या काळांत कुणीही गंभीरपणे दखल घेतली नव्हती. बॅ. नाथ पै यांनी याबाबतीत २७ फेब्रुवारी १९६७ रोजी राष्ट्रपतींना पत्र लिहून "लेम-डक अधिवेशन" भरवू नये आणि घटनेच्या ८५ कलमानुसार तिसरी लोकसभा बरखास्त करावी. हे लंगडे बदक (लेम-डक) नसून मृत बदक आहे." असे कळविले होते. प्रत्यक्ष राष्ट्रपतींची भेट घेऊनही बॅ. नाथ पै यांनी राष्ट्रपतींना आपली भूमिका पटवून दिली होती.

निवडणूक मंडळ नव्या लोकसभेचे अधिवेशन बोलविण्याची सूचना १ एप्रिलनंतरच काढू शकत होते. ही घटनात्मक त्रुटी दूर करण्यासाठी घटनेच्या ७३व्या कलमात दुरुस्ती करण्याचा अधिकार राष्ट्रपतींना होता. अखेर राष्ट्रपतींनी वटहुकूम काढून घटनेच्या ७३व्या कलमात आवश्यक दुरूस्ती केली आणि लोकसभेचे ते 'लेम-डक' अधिवेशन बारगळले. हा बॅ. नाथ पै यांचा व्यक्तिगत मोठा विजय होता.

"जाहिरातबाजी व आरडा-ओरडा केल्याशिवाय शांतपणे व सातत्याने काम केले तर विरोधी पक्षातील एखादा खासदार किती उत्तम काम बजावू शकतो हे नाथ पै यांनी याबातीत मिळविलेल्या विजयावरून कळते." असे 'विक ॲण्ड रिव्ह्यू' ने नाथ पै यांच्या या वियजासंबंधी लिहिले आहे.

'संडे स्टॅण्डर्ड'मध्ये सुप्रसिद्ध पत्रकार फ्रँक मोरेस यांनी लोकसभेतील नाथ पै यांच्या या भाषणाच्या संदर्भात पुढील शब्दांनी नाथ पै यांचा गौरव केला आहे.

"देशाला विधायक सूचना आणि चिकित्सक सल्ला देणारा बॅ. नाथ पै यांच्यापेक्षा दुसरा बुद्धीवान तरुण खासदार मला आजतरी दिसत नाही. जुन्या लोकसभेचे लंगडे अधिवेशन रद्द करून घेण्यात त्यांनीच बाजी मारली. अशावेळी त्यांच्या बुद्धीमत्तेची चमक दिसून येते. आज तथाकथित डाव्यांमध्ये सर्वात जबाबदारीने बोलणारे आणि वागणारे कुशल नेते बॅ. नाथ पैच आहेत. त्यांची प्रखर वाणी, प्रामाणिक आणि जबाबदार नेतृत्व नेहमीच तळपत असते. नाथ पै आपण प्रथम भारतीय या भावनेने पाहातात आणि पक्षापेक्षा देश अधिक श्रेष्ठ मानतात."

## स्वातंत्र्यवीर सेनापती बापट यांना लोकसभेची श्रद्धांजली

महाराष्ट्रातील ज्येष्ठ स्वातंत्र्य सैनिक सेनापती बापट यांचे २७ नोव्हेंबर १९६७ रोजी निधन झाले. सेनापती बापट यांचे भारताच्या चळवळीतील योगदान, मुळशी सत्याग्रहाच्या निमित्ताने शेतकरी वर्गाविषयी दिसून आलेला कळवळा, गोव्याच्या स्वातंत्र्य संग्रामातील त्यांचा सहभाग आणि आयुष्याच्या अखेरच्या पर्वात सीमाप्रश्नासाठी त्यांनी केलेले प्राणांतिक उपोषण या

पार्श्वभूमीवर लोकसभेने त्यांना श्रद्धांजली अर्पण करावी असा आग्रह नाथ पै यांनी लोकसभेत धरला होता. पण नोकरशाहीने सेनापती प्रांतिक पुढारी आहेत, ते लोकसभेचे सदस्य नव्हते या कारणास्तव सेनापतीना लोकसभेत श्रद्धांजली अर्पण करण्यात अडसर निर्माण करून ठेवला होता.

बॅ. नाथ पै यांनी लोकसभेचे सभापती श्री. संजीव रेड्डी आणि सभागृहाला सुनावले, "या लोकसभेचा पाया सेनापती बापटांसारख्या स्वातंत्र्ययोद्यांनी घातला आहे. आपण आज इथे आहोत ते त्यांनी केलेलं बलिदान, स्वातंत्र्यासाठी दिलेली झुंज आणि केलेले आत्मसमर्पण यामुळेच. त्यांची पुण्याई आम्हाला विसरता येणार नाही."

बॅ. नाथ पै यांच्या प्रयत्नामुळे शेवटी १ डिसेंबर १९६७ रोजी लोकसभेने सेनापती बापट यांना श्रद्धांजली अर्पण केली. अशाप्रकारे देशाच्या उभारणीत मोलाचे योगदान असलेल्या मान्यवरांना लोकसभेत श्रद्धांजली अर्पण करण्याची प्रथा बॅ. नाथ पै यांच्यामुळे सुरू केली.

## लोकसभा म्हणजे लोकशाहीचे पवित्र मंदिर

बॅ. नाथ पै लोकसभेला लोकशाहीचे पवित्र मंदिर मानीत असत. सत्तारूढ पक्ष आणि विरोधी पक्ष यांचे वैचारिक आदान-प्रदान करण्याचे व्यासपीठ मानीत असत. लोकसभेतील प्रत्येक क्षण सत्कारणी लागला पाहिजे, बाष्कळतेने वाया जाता कामा नये याबाबत ते सदैव दक्ष असत. लोकसभेतील प्रत्येक क्षणावर जनतेचे लाखो रुपये खर्च होत असतात तेव्हा त्याचा सदुपयोग करणे हे लोकसभा सभासदांचे आद्य कर्तव्य आहे असे ते मानीत असत. आज लोकसभेत विरोधी पक्ष अतिरेकी आकांड तांडव करून लोकसभेचे काम शुल्लक कारणावरून बंद पाडण्यात धन्यता मानतात. बॅ. नाथ पै यांचा अशा प्रकारांना कडवा विरोध असे.

लोकसभेत जेव्हा महाजन अहवाल चर्चेला आला त्यावेळी बॅ. नाथ पै यांच्या प्रजा समाजवादी पक्षाचे कर्नाटकातील खासदार सभापतीच्या आसनासमोर बैठक मारून बसले होते. बॅ. नाथ पै यांनी त्यांना त्यांच्या जवळ जाऊन विचारले, "आज या चर्चेच्या निमित्ताने तुमची बाजू मांडण्याची चांगली

संधी चालून आलेली असताना तुम्ही ती अशा वाह्यात वर्तनाने का दवडता आहात?" बॅ. नाथ पै यांच्या या सवालाने ते खासदार खजील झाले आणि मुकाट्याने आपल्या जागेवर जाऊन बसले. प्रसंगावधान राखून बॅ. नाथ पै यांनी आपल्या अमोल वक्तृत्वाने आणि कौशल्याने असे अनेक प्रसंग हाताळून लोकसभेची शान राखली.

## डॅनियल वॉलकॉट प्रकरण

अमेरिकन नागरिक डॅनियल वॉलकॉट सोन्याचा आंतरराष्ट्रीय चोरटा व्यापार करणारा कुप्रसिद्ध स्मगललर. तो एकदा मुंबई नजीक समुद्र किनाऱ्यावर विमानाने उतरला. तेथून जवळच्या पोलीस स्टेशनवर गेला. आपल्या विमानासाठी त्यांने पोलिसी संरक्षण मिळविले. येथील काम उरकून तो परत निघून गेला. एकदा नव्हे तर तीनवेळा संरक्षण मिळविले. येथील काम उरकून तो परत निघून गेला. एकदा नव्हे तर तीनवेळा संरक्षण आणि पोलीस यंत्रणेच्या हातावर तुरी देऊन तो पळून गेला होता. वॉलकॉट प्रथम 'किल्बी' म्हणून भारतात आला आणि नंतर 'वॉलकॉट' म्हणून आला. हे सारे प्रकरण बॅ. नाथ पै यांनी उजेडात आणले.

१८ नोव्हेंबर १९६३ रोजी तहकुबी सूचनेद्वारा बॅ. नाथ पै यांनी लोकसभेत वॉलकॉट प्रकरणावर चर्चा घडवून आणली. या चर्चेत भाग घेताना बॅ. नाथ पै म्हणाले, "मॉन्तोरिओ, भूपत, लायक अल्ली या सर्वांचा मुकुटपणी वॉलकॉट! असे लोक भारतात येतात कसे? आणि आमचा फजितवाडा करून परत जातात कसे? आमच्या देशांत गुन्हा केलेल्या गुन्हेगाराला सजा देण्यासाठी आम्हाला दुसऱ्या देशाची मदत घ्यायला लागावी हे आमच्या स्वाभिमानाला शोभते काय? आमचे हात असे बळकट व्हावेत आणि टेहळणी खाते खरोखरीच असे जागृत व्हावे की आम्हाला लंडनमधील वाईट हॉलमध्ये जाऊन 'आमच्या गुन्हेगाराला पकडण्यास आम्हाला मदत करा हो!' अशी याचना करण्याची वेळच आमच्यावर न यावी. सर्व गुन्हे माफ झाले आहेत अशा थाटात येणाऱ्या वॉलकॉटला देशात पाऊल टाकयची हिंमत होऊ नये असे सामर्थ्यवान आम्ही कधी बनणार? मॉन्टेरियो आमच्या देशात येऊन म्युनिसिपल कचेऱ्या तुडवितो

आणि वर हे कृत्य केल्याची प्रौढी मिरवितो या सर्वातून काय निष्कर्ष निघतो? काय बोध होतो?" असे प्रश्न उपस्थित करून नाथ पै उपहासाने आणि त्राग्याने म्हणाले, "Here is the land India, No risks involved, No Capial required, unlimited profits guaranted, Come to India."

(ही भारतभूमी, लोकहो या, कुठलीही धास्ती नाही, कुठल्याही भांडवलाची गरज नाही, अफाट नफ्याला वाव, या या भारतात या, तुमचे स्वागत आहे.)

गांधीजींच्या हत्येनंतर एक अमेरिकन सैनिक म्हणाला होता, "या देशात काहीही सुरक्षित नाही, कुणालाही संरक्षण नाही. एका साध्या बंदुकीने मी सबंध हिंदुस्थान जिंकू शकतो." याचा उल्लेख करून नाथ पै म्हणाले, "या त्याच्या उद्‌गाराबद्दल मलाही विलक्षण संताप येतो. तो असे काहीही करू शकणार ही याची जाणीव मला नाही असे नाही, परंतु मला नव्हे; सबंध जगाला तुम्ही खात्री देऊ शकाल का?" असा सरंक्षण मंत्र्यांना सवाल करून बॅ. नाथ पै पुढे म्हणाले, "चीनचे नेते माओत्से तुंग यांनी भारतीय सेनेविषयी म्हटले आहे, 'भारतीय सेना! जी शांततेच्या काळांत अजिंक्य आणि युद्धाच्या काळांत अदृश्य होते तीच काय?' या उद्‌गारातील सत्य बॉलकॉट मोठ्या नाट्यमयरीतीने आपल्याला दाखवून देतो. म्हणूनच या घटनेत झालेली गुंतागुंत आणि त्यातून निघणारा खरा अर्थ जाणून घेऊन सरकारने या समस्येला सामोरे जावे अशी अपेक्षा आहे. आमचे अबकारी खाते बेपर्वा-सुस्त झाले आहे. जकात आणि कस्टम खात्यातच नव्हे एकूण सर्वच संबंधित खात्यांत मोठा गोंधळ माजलेला आहे. सरकारने हे धीटाईने मान्य करावे. ही बाब वैयक्तिक प्रतिष्ठेची करू नये. कोणत्याही एका व्यक्तीच्या अगर खात्याच्या प्रतिष्ठेपेक्षा भारताची प्रतिष्ठा केव्हाही श्रेष्ठ आहे आणि ती राखणे महत्त्वाचे आहे."

बॅ. नाथ पै यांचे हे भाषण अपूर्व ठरले. या भाषणात त्यांनी उपहास, उपरोध, वक्रोक्ती आणि बिनतोड युक्तिवाद यांचा उत्कृष्ट प्रकारे वापर केला होता.

## भारताच्या परराष्ट्रीय व संरक्षण धोरणाविषयक भूमिका

भारताचे परराष्ट्रीय आणि संरक्षण धोरण याबाबत बॅ. नाथ पै यांचा व्यासंग सखोल होता. या विषयावरील त्यांची भाषणे नेहमीच अभ्यासपूर्ण असत. तसेच त्यांत विधायक सूचनाही असत. ६ एप्रिल १९६३ रोजी लोकसभेत संरक्षण खात्याच्या अहवालावर चर्चा झाली. या चर्चेवरील भाषणात नाथ पै म्हणाले, "ज्या देशातील लोकांना आणि सार्वभौम संसदेला संरक्षण विषयक प्रश्नाबाबत पूर्णपणे व पद्धतशीरपणे अज्ञानात ठेवण्यात येते असा भारतावाचून दुसरा लोकशाही प्रधान देश जगात नाही आणि तरी नवल असे की, भारताच्या संरक्षणाविषयी जेवढी माहिती जगातल्या इतर देशांना आहे तेवढी अन्य कोणत्याही देशाबद्दल नाही."

भारताच्या संरक्षण व्यवस्थेतील दोष, त्यातल्या अडचणी आदींची चर्चा त्यांनी केली व त्यावर मार्गही सुचविले. हे भाषण अनेक दृष्टींनी सर्वोत्कृष्ट ठरले.

मद्रासच्या 'हिंदू'ने लिहिले, "नाथ पै यांच्या भाषणाने परमोच्च बिंदू गाठला. १९५७ पासून त्यांनी मांडलेली भूमिकाच बरोबर होती, हे इतिहासाने दाखवून दिले."

नेफाच्या पराभवाच्या चर्चेच्या वेळचे त्यांचे भाषणही एक अविस्मरणीय भाषण मानले गेले आहे.

बॅ. नाथ पै प्रजासमाजवादी पक्षाच्या परराष्ट्रीय धोरणाचे प्रवक्ते म्हणून ओळखले जात. भारताच्या परराष्ट्रीय धोरणावर व कारभारावर त्यांनी लोकसभेत अनेक वेळा टीका केली; पण त्यांची टीका नेहमी अभ्यासपूर्ण आणि मूलभूत स्वरूपाची असायची.

भारताचे परराष्ट्रीय धोरण स्वतंत्र, सार्वभौम, खंडप्राय देशाच्या प्रतिष्ठेला साजेसे नाही असा भारताच्या परराष्ट्र धोरणावर त्यांचा नेहमी आक्षेप असे. भारताने आपल्या हितसंबंधाकडे जागरूकपणे लक्ष दिले नाही. सार्वभौमत्वाने प्राप्त होणारे अधिकारही भारताला नीट वापरता आले नाहीत. तिबेट, अक्साई, चीन, नेफा, काश्मीर इत्यादी प्रश्नात गुंतलेल्या आपल्या हितसंबंधाची भारताने मित्रराष्ट्रानाही नीटशी कल्पना दिलेली नाही. एक स्वतंत्र सार्वभौम राष्ट्र म्हणून योग्यायोग्य काय हे ठरविण्याचा अधिकारही आपण वापरीत नाही.

इजिप्त भारताचे मित्रराष्ट्र; पण त्याचप्रमाणे ते चीन व पाकचेही मित्रराष्ट्र. पण इजिप्तच्या मैत्रीखातर इस्रायलशी नाते घनिष्ट करायला आपण तयार नाही. इस्रायलचे राष्ट्राध्यक्ष दिल्लीमार्गे नेपाळला गेले तर दिल्लीला विमानतळावर राष्ट्रप्रमुखाला साजेशी वर्तणूकही भारत सरकारने त्यांना दिली नाही.

बॅ. नाथ पै यांनी भारताच्या परराष्ट्र धोरणातील व कारभारातील अशा अनेक दोषावर बोट ठेवले, आणि त्यात कोणते बदल पाहिजेत हे वेळोवेळी सूचित केले. भारताच्या परराष्ट्रनीतीचा अपूरेपणा वेळोवेळी निदर्शनास आणला.

## परराष्ट्र मंत्र्यांना विधान मागे घ्यावे लागले.

नामदार एस्. सी. छगला परराष्ट्र मंत्री असतानाची एक कथा सांगणे उचित होईल. १८ जुलै १९६७ रोजी लोकसभागृहात परराष्ट्र धोरणावरील चर्चेत भाग घेताना इस्रायल आणि अरब राष्ट्रे यांच्या संदर्भात बॅ. नाथ पै यांनी खरपूर टीका केली. अरबांना पाठीशी घालणे नाथ पैंना मुळीच मंजूर नव्हते. “आपली भूमिका कधीच तटस्थ नसते; आपण तटस्थ आहोत असे म्हणतो इतकेच.” हे उदाहरणे देऊन नाथने स्पष्ट केले.

परराष्ट्र मंत्री छगला यांना ते झोंबले असावे. उत्तर देताना ते नाथ पैंवर घसरले. नाथच्या वक्तृत्वाचे कौतुक करून “त्यांनी ते वक्तृत्व अधिक चांगल्या कामासाठी वापरावे,” असा सल्ला दिला आणि म्हणाले, “But today I am sorry to say that I have heard the character assassination of our Country indulged in by Mr. Nath Pai.”

नाथ पै यांनी राष्ट्राचे चारित्र्यहनन केले आहे असा आरोप करून छगलांनी आपल्यावर मोहोळ ओढवून घेतले.

आचार्य कृपलानी म्हणाले, “सरकारवर टीका म्हणजे देशावर टीका करणे नव्हे.” हिरेन मुखर्जी, प्रा. रंगा, राममूर्ती, मधु लिमये सारेच ना. छगला यांच्या विधानावर तुटून पडले. शेवटी पंतप्रधान इंदिरा गांधीना मध्यस्ती करावी लागली आणि नामदार छगला यांना बॅ. नाथ पै यांच्या संदर्भातील विधाने मागे घ्यावी लागली.

या घटनेच्या संदर्भात दिल्लीच्या इंडियन एक्सप्रेसने लिहिले, “The hore of the day of the foreign policy debate was not Mr. Chagla, Despite the brave fight he put up but the slim and youthful P.S.P. Member Mr. Nath Pai.”

## पाकिस्तानचे कच्छमधील आक्रमण

कच्छमध्ये पाकित्साननने आक्रमण केल्याची वार्ता प्रथम नाथ पै यांनीच २९ मार्च १९६५ रोजी लोकसभेत जाहीर केली. त्यानंतर ९ दिवसांनी संरक्षण मंत्र्यांनी ते मान्य केले.

२६ एप्रिल १९६५ रोजी लोकसभेत कच्छच्या प्रश्नावर केलेल्या भाषणात कच्छ प्रकरणी मर्मावर बोट ठेवून नाथ पै यांनी संरक्षण मंत्र्यांना पुढील रोकडे प्रश्न विचारले.

“१९६० साली श्री. स्वर्णसिंग यांनी लेफ्टनंट जनरल शेख यांच्याशी करारनामा केला तेव्हा शेख यांनी कच्छच्या रणावर पाकिस्तानचा हक्क सांगितला होता हे खरे आहे काय? स्वर्णसिंगानीही करारावर सही करताना हा प्रश्न वादाचा आहे असे मान्य केले होते काय? आणि हे खरे असेल तर हा प्रश्न वाटाघाटीने सुटावा म्हणून गेल्या पाच वर्षात आपण काय केले? चीनचा कित्ता गिरवून आज पाकिस्तान भारताच्या भूमीवर हक्क सांगत असतांना आमची संरक्षणविषयक तयारी काय आहे? माझा प्रश्न असा आहे की, जी भूमी पाकिस्तानने बळकावली आहे ती ताब्यात घेण्यासाठी तुम्ही काय करणार आहात? कच्छच्या रणामध्ये सध्या जमत नसेल तर दुसरीकडे कुठे तरी प्रतिहल्ला करायची भारत सरकारची तयारी आहे काय?” असा सावाल करून बॅ. नाथ पै यांनी, “ही आमची मागणी आहे. राष्ट्राची व्यथा या मागणीद्वारा मी व्यक्त करीत आहे.” असे भारत सरकारला बजावले.

लोकसभा सभापतींनीही नाथ पै यांच्या विचारांशी आपण पूर्णपणे सहमत असल्याचे सांगून छोट्या कमिटीत या प्रश्नाचा उहापोह करण्याचा सल्ला दिला. पंतप्रधान लाल बहादूर शास्त्री यांनी आग्रह धरला की, “हा प्रश्न पुन्हा सभागृहात उपस्थित केला जाऊ नये.” त्यावर नाथ पै यांनी सांगितले की, “आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी जरूर आम्ही सारे एक आहोत. पण घोडचुकांची पुनरावृत्ती होणार नाही हे पंतप्रधानांनी स्पष्ट सांगावे. यासंबंधी काहीही संदेह राहता कामा नये.” कच्छप्रकरणी नाथ पै यांना वाटणारी भीती अखेर खरी ठरली. कच्छचा प्रश्न हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयात गेला

होता. न्यायालयाचा निकाल भारताच्या विरोधी गेला, छांब बेट पाकिस्तानला द्यावे असा तो निकाल होता. भारताला तो निकाल मानणे अनिवार्य होते. २७ फेब्रुवारी १९६८ रोजी लोकसभेत सरकारविरोधी अविश्वासाच्या ठरावातील चर्चेत बॅ. नाथ पै यांनी भाग घेतला आणि कच्छ निवाड्याची चिरफाड केली.

कच्छप्रकरणी सतत प्रतिटोला हाणा असा नाथ पै यांनी सतत आग्रह धरला. इतकेच नव्हे तर या संदर्भात अणुबाँब तयार करण्याची मागणीही नाथ पै यांनी केली. १० मे १९६५ रोजी लोकसभेत केलेल्या भाषणात नाथ पै म्हणाले, "आमच्या देशाचे संरक्षण करण्याची जबाबदारी आमचीच आहे. आम्हाला वाचविण्यासाठी आणीबाणीच्या प्रसंगी तुणीही धावून येणार नाही ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा परिस्थितीत आपण अण्वस्त्रानी सज्ज होणे आवश्यक आहे."

सप्टेंबर १९६५ मध्ये पाकिस्तानने भारतावर परत आक्रमण केले. त्यावेळी आक्रमणांचा बंदोबस्त करण्यासाठी बॅ.नाथ दोन सूत्रे लोकसभेत सुचविली होती. पहिले सूत्र असे की, एकदा शत्रुने हल्ला केल्यावर आपल्याला सोयीस्कर अशा आपण निवडलेल्या ठिकाणी शत्रुवर मर्माघात करावा. कांजरकोटवरील हल्ल्याला कच्छच्या दलदलीत तोंड देत न बसता ही लढत पंजाबच्या मैदानावर न्यावी असा त्याचा अर्थ होता. दुसरे सूत्र असे की, अलेक्झांडरपासून माओत्से तुंगपर्यंतच्या सर्व आक्रममाणाचा प्रतिकार आक्रमकांच्या प्रदेशाती शिरून केला पाहिजे. याचा अर्थ असा की, पाकिस्तानने काश्मीरवर आक्रमण केले तर भारतीय फौजांनी लाहोरच्या दिशेने कूच केले पाहिजे. ही सूत्रे त्यांनी मांडली त्यावेळी बॅ. नाथ पै यांचे विरोधात टीकेचे काहूर माजले होते. पण १९६५ साली पाकिस्तानच्या कच्छामधील दुसऱ्या आक्रमणाच्यावेळी बॅ. नाथ पै यांची ही सूत्रे स्वीकारली आणि त्यांची अंमलबजावणी केली तेव्हाच आक्रमण परतविले गेले. भारताची मान उंचावली आणि आधुनिक भारताच्या इतिहासात एक नवे पान सुवर्ण अक्षरांनी लिहिले गेले.

## घटना दुरुस्ती विधेयक

भारताची लोकसभा ही सार्वभौम आहे आणि असली पाहिजे, अशी बॅ. नाथ पै यांची धारणा होती. लोकसभेचे हे सार्वभौमत्व अबाधित राखले गेले पाहिजे याबद्दल ते सदैव सतर्क व जागरूक असत. पण पंजाबमधील एक जमीनदार हेन्री गोलकनाथ यांच्या सर्वोच्च न्यायालयातील दाव्यामध्ये सर्वोच्च न्यायालयाच्या फूल बेंचने ५ विरुद्ध ६ अशा एका मताच्या मताधिक्क्याने दिनांक २७ फेब्रुवारी १९६५ रोजी दिलेल्या निवाड्याने बॅ. नाथ पै अस्वस्थ झाले. कारण या निवाड्यात नमूद करण्यात आले होती की, "From taday Parliament will not have the power to amend any of the rights given in section 3, Chapter 3 of the Constution." (यापुढे घटनेच्या तिसऱ्या विभागातील मूलभूत हक्क विषयक कलमात बदल करण्याच अधिकर लोकसभेला राहाणार नाही.)

या निर्णयामुळे लोकसभेच्या हक्कावरच बंधन आले, अशा निर्णयाप्रत नाथ पै आले. त्यांच्यापुढे प्रश्न उभा राहिला, श्रेष्ठ कोण? लोकांनी निवडून दिलेली लोकसभी की सुप्रिम कोर्टाचा निवाडा? त्यांनी सुप्रिम कार्टाच्या निवाड्याचा काळजीपूर्वक अभ्यास केला तेव्हा हा निवाडा परिवर्तनाच्या प्रक्रियेला अडथळा निर्माण करील अशा निष्कर्षाप्रत ते आले. या निवाड्यात न्यायमूर्ती सुब्बराव यांनी लोकांवर अविश्वास व्यक्त केला होता. न्यायमूर्ती सुब्बाराव यांनी या निवाड्यात म्हटले आहे की, "That having regard to the past history of our country, the Supreme Court counld not implicitly believe the representatives of the people, for uncontrolled and unrestricted power might lead to an authoritarian state,"

लोकप्रतिनिधींना अमर्याद व अनिर्बंध अधिकार दिले तर अधिकारशाहीप्रधान राज्य जन्मास येईल असा अभिप्राय न्यायमूर्ती सुब्बाराव यांनी वरील उद्‌गारांनी व्यक्त केला होता.

या निवाड्याने लोकसभेच्या हक्कावर आलेले निर्बंध दूर करण्यासाठी बॅ. नाथ पै यांनी पुढील विधेयक लोकसभेत सादर केले.

## घटना दुरुस्तीच्या संसदेचा अधिकार

उद्देश : ‘गोलखनाथ विरुद्ध पंजाब सरकार’ प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयामुळे आपल्या राज्यघटनेच्या तिसऱ्या विभागातील मूलभूत हक्कविषयक कलमात बदल करणाऱ्या संसदेच्या अधिकाराबाबत लोकमानसात गोंधळ आणि संशय निर्माण झाला आहे. हा प्रश्न संसदीय प्रभुसत्तेच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा आहे. संसद सर्वश्रेष्ठ आहे. याचा अर्थ असा की, घटनेंत नमूद केलेल्या पद्धतीनुसार संसद घटनेतील मूलभूत हक्कांसह कुठल्याही कलमामध्ये फेरबदल करू शकते आणि विशिष्टप्रसंगी त्या हक्कात बदलही करू शकते.

संसदेचा हा हक्क प्रस्थापित करणे आणि सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयामुळे या हक्काबाबत लोकमानसात काही शंका निर्माण झाली असेल तर ती दूर करणे हा या विधेयकाचा उद्देश आहे.

## विधेयक

भारतातील प्रजासत्ताकाच्या अठराव्या वर्षी संसद पुढील कायदा करीत आहे.

१. घटना दुरुस्ती कायदा १९६७ या नावाने हा कायदा ओळखला जावा.

२. घटनेच्या ३६८ कालमात

(अ) पुढील पोट कलम समाविष्ट करण्यात यावे

या घटनेच्या कुठल्याही तरतुदीत या कलमाने घालून दिलेल्या पद्धतीनुसार दुरुस्ती होऊ शकते.

(ब) सध्याचे पोटकलम (२) समजण्यात यावे.

(क) अनुक्रम (२) व्या या पोटकलमामध्ये “या घटनेची दुरुस्ती” या शब्दाऐवजी ‘अशा कोणत्याही तरतुदीची’ हे शब्द घालण्यात यावेत.

बॅ. नाथ पै यांच्या या विधेयकाने देशात जेवढी खळबळ उडवून दिली तेवढी आजवर अन्य कोणत्याही विधेयकाने उडवून दिलेली नाही. समाजातील ‘जैसे थे’वादी या विधेयकावर तुटून पडले तर परिवर्तनवादी विचाराच्या लोकांचा या विधेयकाला सर्वसाधारणपणे पाठिंबा दिसून आला. बॅ. नाथ पै यांनी या विधेयकाच्या निमित्ताने प्रबोधनाचे मोलाचे कार्य बजावले.

देशभर अनेक विद्यापीठातून त्यांची या विषयावर व्याख्याने झाली. पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेतही त्यांचे या विषयावर व्याख्यान झाले.

मुंबई विद्यापीठात सुप्रसिद्ध कायदेपंडित बॅ. पालखीवाला आणि बॅ. नाथ पै या दोघांचा या विषयावर वाद झाला. या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी लॉ कॉलेजचे प्रा. बलसारा होते.

बॅ. पालखीवाला या विधेयकाते कडवे विरोधक होते. त्यांचे भाषण त्यांच्या लौकिकाला साजेसेच झाले. त्यांनी आपल्या भाषणात "न्यायालयाचा बहुमताचा निर्णय मानावा, मूलभूत हक्कात काटछाट करणारा कायदा करण्याचा लोकसभेला अधिकार नाही. घटनेने लोकसभेला मर्यादित अधिकार दिलेले आहेत. सध्याची अराजकतेकडे नेणारी परिस्थिती तर असे काही करायला प्रतिकूल आहे." असे प्रतिपादन केले. बॅ. पालखीवाला यांचे भाषण मुद्देसूद आणि प्रभावी झाले. बॅ. नाथ पै त्यांना कसे उत्तर देतात याकडे सर्वांचे लक्ष लागले होते.

बॅ. नाथ पै यांनी आपल्या प्रभावी आणि अभ्यासपूर्व वक्तृत्वाने त्या दिवशी ती सभा जिंकली. आपल्या भाषणात जहप्रसिद्ध तत्वज्ञ वर्क यांचे "A constitution that cannot be amended is dead Constitution" (जी घटना अपरिवर्तनीय ती घटना मृतवत असते) हे मत उदधृत करून बॅ. नाथ पै म्हणाले, "घटनेचे पावित्र्य आपल्याला मान्य आहे. घटनेचे पावित्र्य टिकविण्या त्यात जे अपवित्र आहे ते काढून टाकण्याची आवश्यकता आहे. मूलभूत हक्कासंबंधी घटना दुरुस्ती करण्याचा अधिकार सुप्रिम कोर्टाला कसा पोहोचतो?" असा प्रश्न उपस्थित करून ते पुढे म्हणाले, "गोलखनाथ केसच्या निर्णयात सुप्रिम कोर्टाने घटना दुरुस्ती केली आहे. कोर्टाने आपल्या कक्षेच्या बाहेर जाऊन हे काम केले आहे." असे सांगून नाथ पै पुढे म्हणाले, "बहुमताचा निर्णय याला महत्त्व नाही. कारण यापूर्वी दोन वेळा सर्वोच्च न्यायालयाने मर्यादातिक्रम केला असा होतो. संसदेला तिच्या स्थानावरून खाली खेचण्याचे जे अपकृत्य सर्वोच्च न्यायालयाकडून झाले आहे. त्याऐवजी संसदेची तिच्या जागी पुनर्स्थापना करणे हे विधेयकाचे उद्दिष्ट आहे." आपल्या प्रतिपादनाच्या समर्थनार्थ नाथ पै यांनी बेकन, बर्क, जेफर्सन, पंडित जवाहरलाल नेहरु

आदींचे दाखले आपल्या भाषमातून दिले. आपल्या भाषणाचा समारोप बॅ. नाथ पै यांनी पुढील संस्कृत श्लोकाने केला.

**राजशक्तेधिष्ठनं लोकशक्तिर्हि तत्त्वत : ।**
**तयोस्तु विग्रहे प्राप्ते लोकशक्तिर्विशिष्यते ।।**

(राजशक्तीचे अधिष्ठान तत्त्वः लोकशाहीत असते आणि राजशक्ती व लोकशक्ती यांच्यात झगडा सुरू झाला तर लोकशक्तीचेच मत प्रस्थापित झाले पाहिजे)

आपल्या अभ्यासपूर्ण व प्रभावी भाषणाने वादात बॅ. नाथ पै यांनी बाजी मारली.

नाथ पै यांनी आपल्या मतदारसंघातील प्रमुख शहरातून आपल्या घटना दुरुस्तीवर व्याख्याने दिली.

दुर्दैवाने चौथी लोकसभा मुदत संपण्यापूर्वीच बरखास्त करण्यात आल्याने बॅ. नाथ पै यांचे ते घटना दुरुस्ती विधेयक बारगळले. पण पाचव्या लोकसभेत सरकार पक्षातर्फेच हे बिल सादर करण्यात आले आणि तेही मंजूरही झाले. या बिलावर भाष्य करताना तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी बॅ. नाथ पै या विधेयकाचे जनक असल्याचे सांगून या विधेयकाचे श्रेय बॅ. नाथ पै यांना दिले.

घटना दुरुस्ती विधेयक हा बॅ. नाथ पै यांच्या संसदीय कर्तृत्वाचा कळस होता.

❒

## कायदे कसे असावेत

दुसऱ्या महायुद्धानंतर आशिया आणि आफ्रिका खंडातील साम्राज्यशाह्यांच्या जोखडातून मुक्त झालेल्या देशांपैकी भारत हा एकमेव देश आहे की ज्या देशांत लोकशाही टिकून आहे. भारतात लोकशाही टिकून राहण्यामागे भारतीय घटनेचा महत्त्वाचा सहभाग आहे. भारताच्या घटना समितीने विविध देशांतील घटनांचा अभ्यास करून भारतातील परिस्थितीला अनुकूल अशी घटना तयार करण्याची बहुमोल कामगिरी बजावली आहे.

भारताच्या घटनेचा त्याचबरोबर विविध देशांतील घटनांचा नाथ पै यांचा सखोल अभ्यास होता. त्यांनी स्वतःसाठी भारतीय घटनेच्या प्रत्येक पानावर एक कोरे पान टाकून घटनेची प्रत बांधून घेतली होती. या पानावर घटनेतील त्या पानावरील कलमाविषयी आपली टीपा-टिपणी केली होती. घटना तसा रूक्ष विषय; पण एखाद्या कवीने आपव्या कवितेविषयी तन्मयतेने बोलावे तसे नाथ पै यांचे घटनेवरील भाष्य असे.

लोकसभेत बॅ. नाथ पै यांनी सतत विरोधी पक्षाचे नेतृत्व केले. पण सत्तारूढ पक्षाच्या नेत्याशी त्यांचे संबंध सदैव सौहार्दाचे आणि सलोख्याचे राहिले होते. याचे कारण कुणाच्याही व्यक्तिगत भावना न दुखविता सौम्य आणि सुयोग्य शब्दात; पण तितक्याच परखडपणे आपले विचार व्यक्त करण्याचे त्यांचे कसब अतुलनीय होते.

लोकसभेत विविध संसदीय आयुधांचा वापर बॅ. नाथ पै यांनी अत्यंत प्रभावीपणे केला. अशासकीय विधेयकांच्या माध्यमातून जनतेच्या विविध जिव्हाळ्याच्या समस्यांकडे शासनाचे आणि समाजाचे लक्ष वेधून घेण्याचे कार्य बॅ. नाथ पै यांनी लोकसभेच्या व्यासपीठावरून अत्यंत प्रभावीपणे केले. नाथ पै यांनी आपल्या लोकसभेच्या कालावधीत सादर केलेली काही महत्त्वाची विधेयके पुढीलप्रमाणे आहेत.

बॅ. नाथ पै यांची लोकशाहीवर नितांत श्रद्धा होती आणि लोकशाहीत लोकांनी निवडून दिलेली संसद म्हणजे लोकसभा ही सार्वभौम असली पाहिजे असे ते मानत असत. लोकसभेला ते लोकशाहीचे मंदिर समजत असत. त्यामुळे "गोलकनाथ विरुद्ध पंजाब सरकार" या खटल्यात वरिष्ठ न्यायालयाने दिलेल्या निर्णयामुळे नाथ पै अस्वस्थ होणे स्वाभाविक होते. या अस्वस्थेतून नाथ पै यांनी दिनांक ७ एप्रिल १९६७ रोजी लोकसभेचा घटना दुरुस्तीचा अधिकार प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने लोकसभेत एक अशासकीय विधेयक सादर केले होते. या विधेयकाचा उद्देश स्पष्ट करताना नाथ पै यांनी म्हटले होते की, "गोलकनाथ विरुद्ध पंजाब सरकार" प्रकरणी वरिष्ठ न्यायालयाने दिलेल्या निर्णयामुळे आपल्या राज्य घटनेच्या तिसऱ्या विभागातील मूलभूत हक्कविषयक कलमात बदल करण्याच्या अधिकाराबाबत लोकमानसात गोंधळ आणि संशय निर्माण झाला आहे. हा प्रश्न संसदीय प्रभुसत्तेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा

आहे. संसद सर्व श्रेष्ठ आहे. याचा अर्थ असा की, घटनेत नमूद केलेल्या पद्धतीनुसार संसद घटनेतील मुलभूत हक्कासह कुठल्याही कलमामध्ये फेरफार करू शकते. संसदेचा हा सार्वभौम हक्क प्रस्थापित करणे आणि वरिष्ठ न्यायालयाच्या निर्णयामुळे या हक्काबाबत लोकमानसांत काही शंका निर्माण झाली असेल तर दूर करणे हा या विधेयकाचा हेतू आहे.

स्वतंत्र भारताच्या लोकसभेत नाथ पै यांच्या घटना दुरुस्ती विधेयकासारखे अन्य कुठलेली विधेयक गाजले नाही. बॅ. नाथ पै यांच्या हयातीत ही घटना दुरुस्ती मंजूर होऊ शकली नाही; पण नाथ पै यांच्या पश्चात लोकसभेला ही घटना दुरुस्ती मंजूर करावी लागली यात नाथ पै यांची दूरदृष्टी आणि थोरवी दिसू आली आहे. बॅ. नाथ पै यांचा मोठा वैचारिक विजय आहे.

## आणीबाणीत न्यायालयाकडे दाद मागण्याचा नागरिकांचा हक्क

लोकसभेच्या हक्कांबाबत नाथ पै जितके जागरूक होते तितकेच ते व्यक्तीच्या व नागरिकांच्या हक्कांबाबतही आग्रही होते. या संदर्भातील बॅ. नाथ पै यांचे विचार समजून घेण्याच्या दृष्टीने त्यांनी लोकसभेला अनुक्रमे दिनांक ७ एप्रिल १९६७ व दिनांक २५ जुलै १९६९ रोजी सादर केलेल्या दोन महत्त्वपूर्ण अशासकीय विधेयकांकडे लक्ष वेधून घेणे आवश्यक वाटते.

दिनांक २५ जुलै १९६९ रोजी बॅ. नाथ पै यांनी आणीबाणीत न्यायालयाकडे दाद मागण्याचा व्यक्तीचा हक्क प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने घटनेचे ३५९वे कलम रद्द करण्यात यावे अशा आशयाचे अशासकीय विधेयक लोकसभेत सादर केले होते. या विधेयकाचा उद्देश स्पष्ट करतांना नाथ पै यांनी म्हटले होते की, आपल्यावर झालेल्या अन्यायाचे परिमार्जन करण्यासाठी न्यायालयाकडे जाण्याचा आणि दाद मागण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाचा मूलभूत हक्क आहे. दुर्दैवाने आपल्या देशात घटनेतील तरतुदीनुसार आणीबाणी जाहीर झाली की हा हक्क स्थगित होता. त्यामुळे गाऱ्हाणे असलेले नागरिक आणि न्यायालये दोन्हीही असहाय्य बनतील. एखाद्या व्यक्तिवर अन्याय झाला आहे हे न्यायालये शाबीत करू शकत असूनही घटनेच्या ३५९व्या कलमांच्या

बंधनामुळे (आणीबाणीचा जाहिरनामा जारी असतांना) न्यायालये त्या व्यक्तीला न्याय देऊ शकत नाहीत. आपल्यावर झालेल्या अन्यायाचे घटनात्मक मार्गानी परिमार्जन करण्याचा व्यक्तीचा हक्क त्याचप्रमाणे ज्याच्यावर अन्याय झाला आहे त्यांना न्याय आणि दिलासा देण्याचा न्यायालयांचा अधिकार अबाधित राहिला पाहिजे. अल्पकाळासाठीही हा हक्क अबाधित राहण्यासाठी घटनेचे ३५९वे कलम रद्दबातल केले पाहिजे.”

## समान न्याय

बॅ. नाथ पै व्यक्ती स्वातंत्र्याप्रमाणएच समान नागरी कायद्याचेही खंदे पुरस्कर्ते होते. न्यायालयासमोर व्यक्ती-व्यक्तीमध्ये भेदाभेद करणे हे जसे नाथ पै यांना मान्य नव्हते तसेच व्यक्ती आणि शासन दोघांनाही न्यायालयासमोर एकाच तराजूने जोखले जाणे आवश्यक आहे असेही त्यांचे मत होते. यादृष्टीने नाथ पै यांनी सिव्हिल प्रोसिजर कोडचे ८०वे कलम रद्द करण्याची तरतूद असलेले एक अशासकीय विधेयक दिनांक ७ एप्रिल १९६७ रोजी लोकसभेला सादर केले होते. या विधेयकाचा उद्देश स्पष्ट करताना नाथ पै यांनी म्हटले की, “सामान्य नागरिकाला उपलब्ध असलेल्या कायद्याच्या संरक्षणापेक्षा वेगळी तरतूद शासनासाठी अथवा सरकारी अधिकाऱ्यांसाठी करणे हे कालबाह्य आहे. ज्या देशात कायद्याच्या राज्याचा अंमल व्हावा यासाठी खरी कळकळ आहे, तळमळ आहे अशा देशांत नागरिकांना शासनाच्या बरोबरीने वागविण्याच्या दिशेने बरीच प्रगती झाली आहे. त्याचप्रमाणे नोकरशाही अतिरेकाला रोखण्यासाठी आणि सामान्य नागरिकाला शासकीय कारवाई विरुद्ध त्वरेने न्याय मिळावा, यासाठी योग्य पावले टाकण्यात आली आहेत. आपल्या राज्यघटनेच्या २३, २२६ आणि २२७ या कलमात हाच दृष्टिकोन प्रतिबिंबित झाला आहे.

सिव्हिल प्रोसिजर कोडचे ८०वे कलम सामान्य नागरिकांवर फार अन्याय करणारे आहे. विशिष्ट मुदतीच्या आत नागरिकाने दावा दाखल केला नाही तर नंतर दावा होऊच शकत नाही. दावा दाखल करण्यासाठी असे मुदतीचे बंधन शासनाला मात्र नाही. शासन नागरिकांविरुद्ध केव्हाही दावा

दाखल करू शकते. शासनाने एखाद्याला काही कार्रवाईची धमकी दिली तर त्याविरुद्ध न्यायालयाकडून तात्पुरते संरक्षण आणि निवारण मिळविणे ८०व्या कलमामुळे त्या नागरिकाला अशक्यप्राय होते. सिव्हिल प्रोसिजर कोडमधील या उणिवा दूर करमे आणि कायद्यासमोर नागरिक आणि शासन यांना एकाच तराजूने मापणे हे या विधेयकांचे उद्दिष्ट आहे.”

# रोजगारीचा हक्क

"रोजगारीचा हक्क" हा घटनेत "मूलभूत हक्क" म्हणून अंतर्भूत व्हावा असा नाथ पै यांचा आग्रह होता. त्यासाठी त्यांनी २८ ऑगस्ट १९७० रोजी "रोजगारीचा हक्क" घटनेच्या मूलभूत हक्कात समाविष्ट व्हा आणि जर शासन रोजगार पुरविण्यास असमर्थ ठरले तर रोजगार उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीत बेकार भत्ता देण्याची तरतूद करणारे एक अशासकीय विधेयक लोकसभेत सादर केले होते. या विधेयकाचे समर्थन बॅ. नाथ पै यांनी पुढील शब्दात केले होते.

"घटनेच्या ३९व्या कलमात इतर अनेक बाबींबरोबर पुढील महत्त्वाचा उल्लेख आहे."

"सर्व स्त्री पुरुष नागरिकांना उपजीविकेची पुरेशी साधने मिळविण्याचा समान हक्क उपलब्ध हील, याद्दष्टीने शासन आपले धोरण आखील."

या उद्दिष्टांची सिद्धता हा आर्थिक क्षेत्रातील शासकीय कारभाराचा केंद्रबिंदू असला पाहिजे होता. बेकारीने कष्टमय जीवन जगणाऱ्यांना केवळ भरपूर शाब्दिक सहानुभूती दाखविण्यात आली आहे, परंतु प्रत्यक्षात बेकारीचे निवारण करण्यासाठी परिणामकारक उपाययोजना करण्यात आलेली नाही. स्वराज्यामध्ये बेकारी हा जणू काही प्रत्येक नागरिकांना मूलभूत हक्क बनला आहे. राष्ट्रीय अर्थव्यवस्था देशातील सर्व धडधाकट लोकांना रोजगार पुरवू शकली नाही तर जनतेचा लोकशाहीवरील विश्वास ढळल्याशिवाय राहाणार नाही. आर्थिक नियोजनाद्वारा सर्वांना काम पुरविणे शक्य नसेल तर किमान पक्षी, शासनाने बेकारभत्ता देण्याची व्यवस्था केली पाहिजे."

नाथ पै यांनी लोकसभेला सादर केलेले हे विधेयक पुढीलप्रमाणे होते.

भारतीय प्रजासत्ताकाच्या एकविसाव्या वर्षी संसद पुढील कायदा करीत आहे.

१) घटना दुरुस्ती कायदा १९७० असे या कायद्याला संबोधिण्यात यावे.
२) घटनेच्या पंधराव्या कलमानंतर पुढील नवे कलम समाविष्ट करण्यात यावे. १६ अ (१) सर्व नागरिकांना काम करण्याचा आणि उपजिविकेची साधने मिळविण्याचा हक्क आहे असले.

२) वरील पोट कलमात निर्देशिल्याप्रमाणे जर नागरिकांना रोजगार मिळू शकला नाही तर शासनाने प्रत्येक नागरिकाला बेकारभत्ता दिला पाहिजे.

## राज्य सीमा मंडळ

मराठी भाषा व महाराष्ट्र हे नाथ पै यांच्या जिव्हाळ्याचे विषय होते. राज्य पुनर्रचना होऊन दीर्घ कालावधी लोटला; तरी महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या सीमांचा प्रश्न अद्यापि अनिर्णित राहिला आहे. लक्षावधी मराठी भाषिक त्यांच्या इच्छेविरुद्ध कर्नाटक राज्यात कोंबले गेले आहेत. मराठी भाषिकांची कर्नाटक राज्यात सर्वांगीम कोंडी चालली आहे. चौथ्या लोकसभेचा कालावधी संपण्यापूर्वी हा प्रश्न सोडविण्याचे आश्वासन सीमावासीयांस दिले गेले होते; पण अजूनही हा प्रश्न वाटाघाटीच्या घोळात घुटमळला आहे. राज्याराज्यातील हे प्रश्न कटूता टाकून सामोपचाराने सोडविण्यासाठी सर्वसंमत मार्गदर्शन तत्त्वांच्या आधारे सोडविले पाहिजेत, असे या प्रश्नांच्या बाबतीत नाथ पै यांचे मत होते. नाथ पै यांनी या संदर्भात १९६९ साली एक विधेयक लोकसभेत सादर केले होते. या विधेयकामागील उद्देश नाथ पै यांनी पुढील शब्दांत व्यक्त केला होता.

“राज्य पुनर्रचना झाल्यावरही सीमा अनिर्णित राहिल्यामुळे राज्याराज्यात सीमाप्रश्नावरुन तंटे वाढत आहेत. त्यातून निर्माण होणाऱ्या कटुतेमुळे राष्ट्राच्या ऐक्याला धोका निर्माण झाला आहे. राष्ट्राचे ऐक्य टिकविण्यासाठी, त्याचप्रमाणे जनतेचा लोकशाही मार्गावरील विश्वास दृढ करण्यासाठी असे सर्व तंटे तातडीने मिटविले पाहिजेत. निश्चित आणि सर्वमान्य तत्त्वांच्या अभावी असे तंटे अजूनपर्यंत मिटू शकले नाहीत. या विधेयकाद्वारे अशी मार्गदर्शक तत्त्वे मांडण्यात येत आहेत.”

नाथ पै यांचे महत्त्वपूर्ण विधेयक पुढीलप्रमाणे होते.

भारतीय प्रजासत्ताकाच्या वीसाव्या वर्षी संसद पुढील कायदा करीत आहे.

१) (अ) “राज्य सीमा मंडळ कायदा, १९६९” या नावाने हा कायदा ओळखला जावा.”

(ब) हा कायदा ताबतोब अंमलात येईल.

२) राष्ट्रपती राज्य सीमा मंडळाची नियुक्ती करतील. या मंडळाने अध्यक्ष वरीष्ट न्यायालयाचे न्यायाधीश राहतील. शिवाय मंडळाचे आणखी दोन सदस्य असतील. मात्र ते केंद्र वा राज्य सरकारचे नोकर असता कामा नयेत.

३) खाली नमूद केलेल्या कसोट्यांच्या आधारे मंडळ प्रत्येक सीमा तंटा सोडवील/मिटवील.

(अ) खेडे हा घटक मानण्यात यावा.

(ब) भाषिक बहुमत आणि ते नसल्यास साक्षेप बहुमत निर्णायक मानण्यात यावे.

(क) वरील दोन कसोट्या लागून करतांना प्रदेशाची भौगोलिक सलगता विचारात घेण्यात यावी.

सीमा प्रश्नाच्या संदर्भात बॅ. नाथ पै यांनी सुचविलेल्या या मार्गाचा अवलंब केला असता तर उभय पक्षातील कटूता टाळून हा प्रश्न यापूर्वीच या सामोपचाराने सोडविता आला असता. अजूनही वेळ टळून गेलेली नाही. या मार्गाने हा प्रश्न आजही सोडविता येईल.

## राज्यापालाची नेमणूक

भारत हे संघराज्य आहे. केंद्र सरकार व राज्य सरकारे हे प्रशासनाचे महत्त्वाचे घटक आहेत. घटनान्वये केंद्र सरकरा व राज्य सरकारे यांचे अधिकार व मर्यादा निश्चित करण्यात आल्या आहेत.

केंद्र सरकार व राज्य सरकार यामधील दुवा हा राज्यपाल आहे. केंद्र शासनाचा प्रतिनिधी म्हणून राज्यपालाची नियुक्ती केंद्र सरकारच्या सल्ल्याने राष्ट्रपती करतात. पण राज्यपाल काहीवेळा लोकशाही प्रथा आणि संकेत झुगारून देऊन बेताल निर्णय घेतात आणि गोंधळ निर्माण करतात, याचा अनुभव आपण अनेक वेळा घेतला आहे. घटनात्मकदृष्ट्या राज्यपालाची नियुक्ती राष्ट्रपतीकडून होत असली तरी लोकसभा ही सार्वभौम असल्याने राज्यपाल लोकसभेच्या कक्षेत असावेत या हेतून बॅ. नाथ पै यांनी ७ एप्रिल १९६७ रोजी राज्यपालांच्या नेमणुकीसंबंधी एक विधेयक लोकसभेला सादर केले होते. या विधेयकाचा उद्देश नाथ पै यांनी पुढील शब्दात व्यक्त केला आहे.

“अलीकडच्या काही घटनांनी हे सप्रमाण सिद्ध केले आहे की, राज्यपाल पद हे नामधारी नाही. राज्यपालपदाच्या कर्तव्याचे निःसक्षपातीपणाने आणि घटनेतील तरतुदीनुसार पालन होणे अगत्याचे आहे. राज्यपालपदावर असणाऱ्या व्यक्तींनी पक्षीय निष्ठा आणि पूर्वग्रह यामुळे आपले निर्णय वा दृष्टी दूषित होऊ देता नये. राज्यपालांनी अशी भूमिका स्वीकारली तरच राष्ट्रीय ऐक्य बळकट होईल आणि संघराज्याचा पायाही अधिक मजबूत होईल.”

बॅ. नाथ पै यांचे ते विधेयक पुढीलप्रमाणे होते. भारतीय प्रजासत्ताकाच्या अठराव्या वर्षी संसद पुढील कायदा करीत आहे.

१) “घटना दुरुस्ती कायदा १९६७” असे या कायद्यास संबोधण्यात यावे.

२) घटनेच्या १५५ व्या कलमांला पुढील पोट कलम जोडण्यात यावे.

राज्यपालाच्या नेमणुकीला संसदेच्या दोन्ही सभागृहांची मान्यता मिळणे आवश्यक आहे. अशी मान्यता मिळेपर्यंत राज्यपालाने राज्यपालपदाची अधिकार सूत्रे हाती घेता काम नयेत.”

बॅ. नाथ पै यांनी लोकसभेत सादर केलेली वरील विधेयके त्यांच्या लोकशाहीवर, श्रद्धेवर व जनसामान्यावरील निष्ठेवर तसेच दूरदृष्टीवर पुरेसा

प्रकाश टाकीत आहेत. तसेच समाजवादावरील त्यांची अचल निष्ठा व्यक्त करीत आहेत. तीन तपांपूर्वी त्यांनी लोकसभेत सादर केलेली वरील विधेयके लोकसभेने मंजूर केली असली तर देशातील अनेक गुंतागुतीच्या समस्या सोडविण्यास मदत झाली असती. तीन तपांपूर्वी लोकसभेला सादर केलेल्या वरील विधेयकांची देशाला आजही गरज आहे.



## समाजवादाचा राजदूत

***"नाथ म्हणजे समाजवादी पक्षाचा ॲम्बासिडर-राजदूत! समाजवादी पक्षाची अप्रतिम प्रतिमा लोकांत आणि राज्यकार्यात निर्माण करण्याची ती एक समृद्ध शक्तीच होती. समाजवादी पक्षाचा संसदीय प्रवक्ता म्हणून नाथच खरोखरच शोभला. त्याने राज्यकार्यात केवळ दरारा निर्माण केला नाही तर आदरही निर्माण केला. 'समाजवादाचे संसदीय प्रवक्ते' असं जेव्हा नाथबद्दल मी म्हटलं तेव्हा त्याचं वक्तृत्वच मला अभिप्रेत नव्हतं. त्याची संस्कारिता आणि सभ्यताही मला तितकीच अभिप्रेत होती. लोकसभा हे लोकशाहीच्या क्रियाशील अस्तित्वाचं एक थोर स्थान असतं. त्याला अनुरुप अशी नाथची संस्कृती होती. म्हणूनच नेहरुंनी त्याचं वर्णन 'एक जंटलमन पोलिटिशियन' असं केलं होतं. सभ्यतेच्या एका समूर्त अवतारानं सभ्यतेच्या दुसऱ्या एका तितक्याच समूर्त अवताराला दिलेलं हे प्रशस्तिपत्र होतं."***

**प्रभाकर पाध्ये**

श्री. वासू देशपांडे लिखित 'लोकशाहीचा कैवारी'च्या प्रस्तावनेतून

बॅरिस्टर होण्यासाठी ब्रिटनमध्ये गेलेल्या नाथ पै यांनी येथील वास्तव्यात कायद्याच्या अभ्यासाबरोबरच संसदीय लोकशाही, युरोपमधील मजूर पक्षांचे कार्य, कामगार चलवळ आणि समाजवादी आंदोलन यांचाही सखोल अभ्यास केला. तेथील वास्तव्यात मजूर पक्षाच्या कार्यात, कामगार चळवळीत आणि समाजवादी आंदोलनात त्यांचा सक्रिय सहभाग होता. ब्रिटनमधील इंडियन सोशलिस्ट ग्रुप, इंडियन मजलिस, ब्रिटन-इंडियन सोशलिस्ट फेलोशीप, आंतरराष्ट्रीय समाजवादी युवक संघटना (International Union of Sacialist Youth-युसी) आदी भारतीयांच्या आणि समाजवादी विचाराच्या संस्थामध्ये त्यांनी जबाबदारीची पदेही समर्थपणे सांभाळली. ज्येष्ठ पत्रकार आणि विचारवंत मा. प्रभाकर पाध्ये यांनी नाथ पै यांना 'समाजवादाचा राजदूत' ही दिलेली उपाधी सर्वार्थाने सार्थ होती. त्यांनी केवळ समाजवादी पक्षाचेच प्रतिनिधी म्हणून काम केले असे नाही तर अनेक बाबतीत आंतरराष्ट्रीय क्षेत्रात भारताचे प्रतिनिधी म्हणूनही समर्थपणे काम केले पंडित जवाहरलाल नेहरु

यांनी ‘जंटलमन पोलिटीशियन’ म्हटले. आतंरराष्ट्रीय क्षेत्रातही बॅ. नाथ पै यांची प्रतिमा ‘जंटलमन पोलिटीशियन’ अशीच होती.

## संसदीय लोकशाहीचा अभ्यास

लंडनला गेल्यावर ज्या ब्रिटनच्या पार्लमेंटबद्दल ‘House of Commons can do and undo anything except changing a man to woman and woman to a man’ असे म्हटले जाते, त्या पार्लमेंटच्या सभागृहाचे नाथ पै यांनी प्रथम दर्शन घेतले. याच हाऊस ऑफ कॉमन्सने इंग्लंडचा इतिहास घडविला. हाऊस ऑफ कॉमन्स ही जगातील कायदेमंडळीची जननी आहे. या हाऊस ऑफ कॉमन्सच्या हातात सत्ता राहावी म्हणून जनता लढली होती. हाऊस ऑफ कॉमन्सचे सभासद लढले होते. फार मोठे मूल्य त्यांनी दिले होते. फार मोठी किंमत त्यांनी मोजली होती. या हाऊस ऑफ कॉमन्सच्या कार्यपद्धतीची नाथने इंग्लंडमधील आपल्या वास्तव्यात माहिती घेतली होती. अनेक नामनंत संसदपटूंची भाषणे त्यांनी वाचून काढली. पार्लमेंट हाऊसमध्ये ते नेहमी जायचे तेथे तासन्तास बसायचे. कॉमन्स सभागृहातील कामकाजाचे बारकाईने निरीक्षण करायचे.

एकदा हाऊस ऑफ कॉमन्समध्ये परराष्ट्र धोरणावर चर्चा व्हावयाची होती. नाथपैना ती ऐकायची होती. प्रयत्न करुन त्यांनी प्रेक्षकांच्या गॅलरीत प्रवेश मिळवला. याविषयी बेळगांवच्या एका मित्राला लिहिलेल्या पत्रात नाथ पै यांनी केलेले वर्णन मनोज्ञ आहे. या पत्रात नाथ पै म्हणतात.

“समोर दिसणारा देखावा मोठा भव्य अन् सुंदर असा आहे! सभागृह ज्या ठिकाणी सभा प्रत्यक्ष भरते ते फार मोठे नाही. पण त्याची सजावट मोठी सुबक आहे. बेव्हीनचे भाषण संपून गेले होते. प्रत्यक्ष डोळ्यांना जे दिसत होते, कानांना जे ऐकू येत होते त्यापेक्षा माझ्या मनाला अनेक गोष्टी दिसत होत्या, ऐकू येत होत्या, तो पिम्, तो हॅम्डन, तो क्रॉम्बवेल, बर्क, ग्लॅडस्टन सारे सभोवार बसले आहेत अन् सारे बोलत आहेत, असा भास होत होता. अगदी विचित्र अनुभव होता तो. जो गृहस्थ बोलत होता, तो अगदीच गचाळ बोलत होता, त्यानंतर झालेली सर्व भाषणे एक वगळल्यास म्युनिसिपालीटीत

होणाऱ्या भाषणाहून उच्च दर्जाची होती असे म्हणणे कठीण होईल! एका लेबर एम्.पी.चे भाषण मात्र मुद्देसूद होते. अगदी पुराव्यानिशी, त्यांनी अमेरिकेची अन् बेव्हीनची हजेरी घेतली. सभासद मात्र अगदी सासऱ्याच्या दिवाणखान्यात बसल्यासारखे पाय समोर ताणून किंवा समोरच्या बाकावर पाय सोडून बसले होते. कसले लोळत होते, जे पाहिले त्यामुळे मनाला प्रसन्न वाटले; पण जे ऐकले त्यात काही विशेष होते असे मात्र मुळीच वाटले नाही. हो, बसल्या ठिकाणाहून श्री. चर्चिल यांचे प्रकाशाच्या झोतात चमकणारे टक्कल दिसत होते!"

ब्रिटनमधील संसदीय कार्यपद्धतीचा अभ्यास नाथ पै यांना भारताच्या लोकसभेत काम करताना उपयुक्त ठरला.

## इंडियन सोशालिस्ट ग्रुप

लंडनमध्ये 'इंडियन सोशालिस्ट ग्रुप' स्थापन झाला होता. नाथने या ग्रुपच्या कामात लक्ष घातले, ते ग्रुपच्या सभांना उपस्थित राहात. आंतरराष्ट्रीय राजकारणाचा अभ्यास या वर्गातून चाले. नाथच्या कायद्याच्या अभ्यासाबरोबरच संसदीय लोकशाहीचा आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाचा अभ्यास सुरू झाला. इंडियन सोशालिस्ट ग्रुपमध्ये नाथचा प्रभाव वाढू लागला. नाथचे वक्तृत्व, अभ्यास करण्याची प्रवृत्ती आणि सर्वांना घेऊन पुढे जाण्याचा प्रयत्न, यामुळे या ग्रुपचे नेतृत्व नाथकडे आले. पदाधिकारी कोणी असो, नाथचा सल्ला सर्वांना प्रमाणभूत वाटू लागला.

लंडनमध्ये, 'इंडियन मजलिस' या नावाची भारतीयांची एक संस्था कार्यरक होती. नाथ पै यांनी इंग्लंडमधील वास्तव्यात या संस्थेच्या कार्यातही लक्ष घातले होते. लंडनमधील भारतीयांच्या हितसंबंधाचे रक्षण करणे, भारतीय विद्यार्थ्यांना अध्ययनात मदत करणे आणि सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करून मातृभाव निर्माण करणे ही कामे मजलिसमार्फत चालत, नाथच्या इंग्लंडमधील कार्याच्या कक्षा झपाट्याने वाढत गेल्या. ते इंडियन मजलिसचे अध्यक्ष झाले. इंग्लंडमधील वास्तव्यात दोन वर्षे ते या संस्थेचे

अध्यक्ष होते, तसेच ‘लिग अगेंस्ट इंपिरीयॅलीझम’ या संस्थेचे उपाध्यक्षपद यांनी भूषविले होते.

इंडियन सोशालिस्ट ग्रुपशी नाथचा संबंध दृढ झाला होता. त्या संस्थेच्या सेक्रेटरीपदी त्यांची निवड झाली होती. ही संस्था आंतरराष्ट्रीय समाजवादी युवकांची संघटना ‘इंटरनॅशनल युनियन ऑफ सोशालिस्ट युथ’ला जोडलेली होती. त्यामुळे नाथचा या संस्थेशी संबंध आला आणि ते या संस्थेच्या कार्यकारिणीवर निवडले गेले. नाथ पै यांच्या कार्याला एक नवीन क्षेत्र मिळाले. वसाहतवादाविरुद्धचा लढा लढविण्यात त्यांनी या संस्थेला प्रवृत्त केले. जुलै ४९ मध्ये फ्रान्समधील टुलुस या शहरी झालेल्या इंटरनॅशनल युनियन ऑफ सोशालिस्ट युथच्या कार्यकारिणीच्या सभेत गोव्यावरील पोर्तुगीज सत्तेचा निषेध करण्यात आला. सालाझारच्या जुलमी राजवटीविरुद्ध तीव्र नापसंती व्यक्त करण्यात आली. हा पहिला प्रसंग ज्यात आंतरराष्ट्रीय मंचावर गोवा आणि पोर्तुगीज वसाहतशाहीवर चर्चा झाली. पोर्तुगीज साम्राज्यशाहीचा या व्यासपीठावरून प्रथमच निषेध केला गेला होता.

## ब्रिटन-एशियन सोशालिस्ट फेलोशिप

ब्रिटनमधील वास्तव्यात नाथ पै यांनी ब्रिटीश मजूर पक्षाच्या कामामध्येही लक्ष घातले. त्या पक्षाचे कार्य जवळून अभ्यासकाच्या भूमिकेतून पाहिले. नंतरच्या काळात या पक्षाचे कार्यही करू लागले आणि मजूर चळवळीतही भाग घेऊ लागले. ब्रिटनमध्ये त्या काळात झालेल्या पार्लमेंटच्या पोटनिवडणुकांमध्ये मजूर पक्षाच्यावतीने निवडणूक प्रचारातही भाग घेतला. नाथच्या वक्तृत्वाचा परिणाम मजूर पक्षाच्या नेत्यांवरही झाला आणि नाथची आणि त्यांची जवळीक निर्माण झाली. देशभक्ती, चारित्र्य व कार्यक्षमता या गुणांचा समुच्चय नाथमध्ये झाल्यामुळे मजूर पक्षातील नेते मंडळी प्रभावीत झाली. त्यावेळचे ब्रिटनचे पंतप्रधान लॉर्ड क्लेमंट ॲटलीशी नाथचा संबंध आला आणि पुढे तो वृद्धिंगत झाला. या तरुण, बुद्धिमान भारतीय कार्यकर्त्याबद्दल त्यांना आपुलकी वाटू लागली. पुढे “ब्रिटन-एशियन सोशालिस्ट फेलोशीप” या संस्थेची स्थापना झाली. क्लेमंट ॲटली या संस्थेचे

अध्यक्ष होते. मजूर पक्षाचे एम्.पी.के. मंगर हे तिचे कार्याध्यक्ष आणि बॅ. नाथ पै उपकार्याध्यक्ष झाले.

## आंतरराष्ट्रीय समाजवादी युवक संघटनेचे पहिले भारतीय अध्यक्ष

लंडनमधील 'इंडियन सोशालिस्ट ग्रुप'चे नाथ पै सेक्रेटरी झाले याचा उल्लेख वर आलाच आहे. ही संघटना 'इंटरनॅशनल युनियन ऑफ सोशालिस्ट युश (युसी)' या आंतरराष्ट्रीय समाजवादी युवक संघटनेशी संलग्न होती. त्यामुळे नाथचा या संघटनेशी संबंध आला. लवकरच युसीच्या कार्यकारिणीवर त्यांची निवड झाली. नाथ पै यांच्या कार्याला एक नवीन क्षेत्र मिळाले. वसाहतवादाविरुद्धचा लढा लढण्यास त्यांनी युसीला प्रवृत्त केले. स्वीडन येथे युसीचे ९वे अधिवेशन भरले होते. या अधिवेशनात नाथ पै यांची तीन वर्षासाठी युसीच्या अध्यक्षपदी निवड झाली. नाथ हे पहिले भारतीय की जे आंतरराष्ट्रीय समाजवादी युवक संघटनेचे अध्यक्ष निवडले गेले होते. नाथने समाजवादी आंदोलनात केलेल्या कार्याचा हा गौरव होता आणि त्याने तो स्वकर्तृत्वावर संपादन केला होता.

युरोपमधील वास्तव्यात आंतरराष्ट्रीय समाजवादी आंदोलनात नाथ पै सक्रिय झाले; तरी भारतातील राजकीय घडामोडींकडे त्यांचे लक्ष होते. नाथने लंडनहून श्री. परशुराम शहापूरकर यांना लिहिलेल्या पत्रात लिहिले होते, "इथे राहून मी समाजवादाची (इथल्या किंवा भारतातल्या) सेवा करू शकेन असे मी कधी मानले नाही. इथे राहाण्यात माझ्या मनाला, विशेषतः गोमंतकातील लढा चालू असताना पक्षात पक्षाच्या जीवनमरणाचा लढा लढता जात असताना जे क्लेश माझ्या मनाला झाले आहेत त्याची वाच्याता किंवा चर्चा मी करू शकत नाही. करू इच्छित नाही. पुन्हा तुमच्याबरोबर आम्हाला योग्य वाटणाऱ्या मार्गाने जाण्यास माझे मन आतुर आहे. विल्यम मॉरिस नावाचा एक थोर समाजवादी इथे गेल्या शतकांत होऊन गेला. तो एकदा म्हणाला होता, 'आजच्या युगात सुखी होण्याचे केवळ दोनच मार्ग आहेत. समाजवादासाठी झगडणे व समाजवादासाठी जीवन जगणे.' मला ही सुखाची कल्पना मोठी हद्द वाटते."

नाथने आपल्या युरोपमधील सर्व दौऱ्यांतून गोमंतकाचा प्रश्न उपस्थित करून गोव्यावरील सालाझारच्या जुलमी राजवटीचे आपल्या भाषणातून यथार्थ दर्शन घडविले आणि युरोपियन जनतेची सहानुभूती गोव्याच्या स्वातंत्र्यलढ्याला मिळविली. पोर्तुगालने भारताविरोधी प्रचाराची पद्धतशीर आघाडी उघडली होती. भारताची बाजू मांडण्याची जबाबदारी परदेशातील भारतील वकिलातींवर होती; पण भारताची वकिलाती याबाबतीत निष्क्रिय राहिल्या. गोव्याविषयी नाथ पै यांनी एकट्याने युरोपात जी कामगिरी बजावली तिला तोड नाही. युसीच्यावतीने युरोपात पोर्तुगीज वकिलातीसमोर वसाहतवादविरोधी निदर्शने घडवून आणली. ब्रिटीश लेबर पार्टी, डच लेबर पार्टी, नार्वेजियन लेबर पार्टी, जर्मनी, स्वीडन, फिनलंड आदी युरोपातील विविध देशातील सोशल डेमॉक्रीट पक्षांनी गोव्याच्या लढ्याला पाठिंबा व्यक्त केला होता. फेन्नर ब्रॉकवे, रेजिनॉल्ड, ॲन्यनी वेजवुड बेन आदी समाजवादी नेत्यांनी गोव्याच्या लढ्याला मदत करण्यासाठी समितीही स्थापन केली होती. इंग्लंडच्या राणीने पुढाकार घेऊन गोव्याच्या प्रश्नात मध्यस्थी करावी असे सुचविणारा ठरावही मजूर पक्षीय खासदारांनी पार्लमेंटकडे पाठविला होता. नाथ पै हे युनेस्कोच्या युवक विभागाच्या गर्व्हर्निंग बॉडीचेही सभासद होते. त्यांच्या बैठकीसाठी त्यांना परदेशी जावे लागत असे. या बैठकीचा पोर्तुगालविरोधी वातावरण तयार करण्यासाठी नाथ पै यांनी पुरेपूर उपयोग करून घेतला आणि गोमंतकीयांचे गाऱ्हाणे जगाच्या व्यासपीठावर सातत्याने मांडले. नाथ पै हे गोव्याच्या बाबतीत भारताचे अनाधिकृत फिरते वकीलच झाले होते.

युसीचे अध्यक्ष या नात्याने नाथने युरोपातील विविध देशांना भेटी दिल्या. नाथ पै यांच्या प्रयत्नामुळे भारतातील राष्ट्र सेवादलाला युसीशी संलग्नता मिळाली. पश्चिम जर्मनीतील म्युनिच शहरी युसीच्यावतीने एक शिबिर आयोजित करण्यात आले होते. जगातील विविध देशातील सहा हजार युवक या शिबिरात सहभागी झाले होते.

१९६० सालापर्यंत सलग सहा वर्षे बॅ. नाथ पै युसीचे अध्यक्ष होते. युसीच्या नियमाप्रमाणे वयाच्या ३७व्या वर्षी नाथ पै यांना युसीच्या अध्यक्षपदावरून निवृत्त होणे आवश्यक होते. १९६० साली व्हिएन्ना येथे युसीचे

द्वैवार्षिक अधिवेशन झाले. जगातील ७५ देशातील युवकांचे प्रतिनिधी या अधिवेशनाला उपस्थित होते. युसीच्या अध्यक्षपदावरून निवृत्तीपूर्वी केलेल्या अखेरच्या भाषणात नाथ पै यांनी जगातील समाजवाद्यांपुढे असलेल्या आव्हानांची जाणीव स्फूर्तिदायक शब्दात करून दिली. सर्व देशातील प्रतिनिधींची बॅ. नाथ पै यांनीच अपवाद म्हणून अध्यक्षपदी राहावे अशी इच्छा होती. पण ते नीतीला सोडून झाले असते. म्हणून नाथ पै यांनी असा अपवाद स्वीकारायलाही निर्धाराने नकार दिला. मिळालेली खुर्ची सहजासहजी सोडायची कोणाची तयारी नसते. पण नाथ पै याला अपवाद ठरले.

## लंडनमध्ये साने गुरुजींचे स्मारक

साने गुरुजींवर नाथ पै यांची अपार श्रद्धा होती. लंडनमधील वास्तव्यात गुरुजींच्या नावे लंडनमध्ये विद्यार्थी वसतिगृह बांधण्याचे ठरले. गुरुजींचे वसतिगृहाच्या रूपाने उभारायचे हे स्मारक उभारण्याची जबाबदारी पार पाडण्यासाठी नाथना काही दिवस लंडनमधील मुक्काम वाढवावा लागला. हे वसतिगृह आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे होते. वसतिगृहात भारत व इतर देशातील विद्यार्थ्यांच्या निवासाची सोय केली जाणार होती. साने गुरुजी वसतिगृहाचे काम पूर्ण करून बॅ. नाथ पै भारतात परत आले.

## प्रजा समाजवादी पक्षाचे प्रवक्ते

नाथ पै वयाच्या अठराव्या वर्षापासून भारतीय राजकारणात सक्रिय झाले होते. १९४० साली राष्ट्रसेवादलाच्या शाखेपासून त्यांच्या राजकीय वाटचालीला प्रारंभ झाला. नाथ पै यांच्या राजकीय कारकीर्दीची दोन पर्वे पडतात. १९५७ साली राजापूर लोकसभा मतदारसंघातून लोकसभेवर निवडून येण्याच्या पूर्वीचे पहिले पर्व व १९५७ साली लोकसभेवर निवडून आल्यानंतरचे दुसरे पर्व. पहिल्या पर्वात त्यांचे राजकारणातील स्थान दुय्यम दर्जाचे होते. राष्ट्र सेवा दल, गोव्याचा स्वातंत्र्य संग्राम, कामगार चळवळ, संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन यामध्ये पहिल्या पर्वात हे सक्रिय होते. १८ जून १९४६ साली समाजवादी नेत डॉ. राम मनोहर लोहिया यांनी गोव्याच्या स्वातंत्र्य संग्रामाची चेतविलेली ज्योत पुढे गोव्याची मुक्ती होईपर्यंत तेवत ठेवण्यात बॅ. नाथ पै आणि त्यांच्या सहकाऱ्यांचा सक्रिय सहभाग होता.

स्वातंत्र्यपूर्व काळात भारतीय राजकारणात वकील, बॅरिस्टरांचे वर्चस्व होते. राजकारणातील सक्रिय होण्याच्या उद्देशानचे नाथ पै यांनी बॅरिस्टर होण्याचे ठरविले होते. बॅरिस्टर होण्यासाठी इंग्लंडला गेले असताना भारतात १९५२ साली लोकसभा आणि विधानसभांच्या प्रौढ मताधिकार पद्धतीने पहिल्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. त्यावेळी मुंबई प्रांतात असलेल्या बेळगांव विधानसभा मतदारसंघातून त्यावेळच्या समाजवादी पक्षाच्यावतीने नाथ पै यांची उमेदवारी निश्चित करण्यात आली होती. ही निवडणूक लढविण्यासाठी ते बॅरिस्टरचा अभ्यासक्रम अर्धवट सोडून भारतात परत आले. या निवडणुकीत समाजवादी पक्षाला प्रचंड पराभवाला सामोरे जावे लागले. बेळगांव विधानसभा मतदारसंघातून पराभूत झाल्यावर बॅरिस्टर होण्यासाठी नाथ पै यांनी परत इंग्लंडला प्रयाण केले.

१९५२च्या निवडणुकीनंतर आचार्य जे. बी. कृपलानी यांचा कृषक मजदूर प्रजा पक्ष आणि समाजवादी पक्ष यांच्या एकीकरणातून प्रजा समाजवादी पक्षाचा भारताच्या राजकीय क्षितिजावर उदय झाला. १९५२च्या निवडणुकीत केरळमध्ये अल्पमतात असलेल्या समाजवादी पक्षाचे काँग्रेसच्या

पाठिंब्यावर सरकार सत्तेवर आले. त्रावणकोर-कोचीन संस्थानचे माजी दिवाण पट्टम थाणू पिल्ले केरळचे मुख्यमंत्री झाले. पण त्यांच्या कारकीर्दीत केरळात झालेल्या गोळीबाराचा निषेध करून समाजावादी नेते डॉ. राम मनोहर लोहिया यांनी त्यांच्या राजीनाम्याची मागणी केली. या राजीनाम्याच्या प्रकरणावरून प्रजा समाजवादी पक्षातील वैचारिक मतभेद चव्हाट्यावर आले. मतभेदातून प्रजा समाजवादी पक्ष दुभंगला. डॉ. राम मनोहर लोहिया, मधु लिमये, राजानारायण आदी समाजवादी नेत्यांनी समाजवादी पक्षाची पुनर्स्थापना केली. प्रजा समाजवादी पक्ष दुभंगला त्यावेळी नाथ पै यांचे वास्तव्य इंग्लंडला होते. प्रजा समाजवादी पक्षाच्या दुफळीने नाथ पै  व्यथित झाले.

बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर बॅ. नाथ पै भारतात परतले आणि भारतीय राजकारणात सक्रिय झाले. १९५७च्या दुसऱ्या सार्वत्रिक निवडणुकीत बॅ. नाथ पै प्रजा समाजवादी पक्षाच्यावतीने संयुक्त महाराष्ट्र समितीचे उमेदवार म्हणून लोकसभेवर निवडून आले. १९६० साली झालेल्या केंद्रीय सरकारी कर्मचाऱ्यांच्या संपाचे नेतृत्व बॅ. नाथ पै यांनी केले आणि राष्ट्रीय नेते म्हणून त्यांच्या नेतृत्वाला अखिल भारतीय स्तरावर मान्यता मिळाली. १९५७ सालापासून लोकसभेत बॅ. नाथ पै यांनी प्रजा समाजवादी पक्षाचे नेतृत्व केले तर संसदेच्या बाहेर प्रजा समाजवादी पक्षाचे प्रवक्ते म्हणून ते वावरले.

## समाजवादी ऐक्यासाठी प्रयत्न

पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीनंतर प्रजासमाजवादी पक्ष दुभंगला त्यावेळी बॅ. नाथे पै यांचे वास्तव्य इंग्लंडमध्ये होते. समाजवादी पक्ष दुभंगल्याने नाथ पै व्यथित झाले. भारतात परत आल्यापासून समाजवादी पक्षाच्या ऐक्यासाठी ते सक्रिय झाले. १९६४ साली समाजवादी नेत डॉ. राम मनोहर लोहिया यांनी समाजवादी पक्षांचे बिनशर्त ऐक्य व्हावे अशी सूचना केली. एस्. एम्. जोशी त्यावेळी प्रजा समाजवादी पक्षाचे अध्यक्ष होते. प्रजा समाजवादी पक्षाच्या रामगड अधिवेशनात समाजवादी पक्षांच्या ऐक्यासंबंधी चर्चा झाली. समाजवादी पक्षाने प्रतिनिधी म्हणून राजनारायण या अधिवेशनाला उपस्थित

होते. त्यांनी समाजवादी पक्षांच्या ऐक्याची आवश्यकता प्रतिपादन केली. अधिवेशनाने ऐक्यविषयक बोलणी करायला मान्यता दिली. झपाट्याने पावले टाकली गेली आणि संयुक्त समाजवादी पक्षाची स्थापना झाली. समाजवादी नेते एस्. एम्. जोशी यांची संयुक्त समाजवादी पक्षाच्या अध्यक्षपदी निवड करण्यात आली.

ऐक्य झाले; पण मने जुळली नाहीत. ऐक्य टिकणार नाही याची लक्षणे प्रथमपासूनच दिसू लागली. राजनारायण हा अडथळा होणार हे दिसतच होते. संयुक्त समाजवादी पक्षाच्या कचेरीत जाऊन श्री. राजनारायण यांनी प्रेम भसीन यांचा पाणउतारा केला. प्र.स.पक्षीय लकवामार आहेत असा प्रचार सुरू होताच 'गोरे-नाथ पै कौन है? अमेरिकेके दलाल है।' अशा घोषणाही दिल्या गेल्या. अशा परिस्थितीत समाजवादी पक्षाबरोबर कार्य करणे प्रजा समाजवादी पक्षाच्या कार्यकर्त्यांना असह्य झाले. प्रजा समाजवादी कार्यकर्ते अधिवेशनातून बाहेर पडले आणि स्वतंत्र अधिवेशन घेऊन त्यांनी प्रजा समाजवादी पक्षाची पुनर्स्थापना केली. साथी नानासाहेब गोरे यांची प्रजा समाजवादी पक्षाच्या अध्यक्षपदी निवड करण्यात आली. साथी एस्. एम्. जोशी संयुक्त समाजवादी पक्षातच राहिले, याचे बॅ. नाथ पै यांना अतिशय दुःख झाले. समाजवादी ऐक्याचे प्रयत्न विफल झाले याचेही दुःख होतेच.

भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू आणि नेहरू नंतरचे पंतप्रधान लाल बहाद्दूर शास्त्री दोघांनीही आपल्या मंत्रीमंडळात बॅ. नाथ पै यांनी परराष्ट्री मंत्रीपद देऊ केले होते. विरोधकांनी बॅ. नाथ पै काँग्रेस प्रवेश करमार असा सातत्याने अपप्रचार करून नाथ पै यांचे एकप्रकारे चारित्र्यहनन चालविले होते. पण समाजवादावर प्रखर निष्ठा असलेल्या नाथ पै यांना पक्ष बदलाचा विचार चुकूनही सुचला नाही. अखेरपर्यंत ते आपल्या विचाराशी प्रामाणिक राहिले. वयाच्या अवध्या पन्नासाव्या वर्षी त्यांना मृत्यूने गाठले. त्यांच्या मृत्यूने केवळ भारतातील नव्हे तर आंतरराष्ट्रीय समाजवादी आंदोलनाची अपरिमित हानी झाली आहे. ज्येष्ठ पत्रकार मा. प्रभाकर पाध्ये यांनी नाथविषयी 'Nath is the most successful leader of the most defeated party' असे केलेले विधान कटू असले तरी सत्य आहे.



## कोकणचा अनाभिषिक्त राजा

नाथ पै यांच्या निधनाने वृत्त एका वृत्तपत्राने ‘कोकणचा अनाभिषिक्त राजा गेला’ हा मथळा देऊन छापले होते. नाथ पै यांच्याविषयीच्या कोकणवासीयांच्या भावनाचे यथार्थ दर्शन या मथळ्याने घडविले आहे. खऱ्या अर्थाने नाथ पै यांनी कोकणवासीयांच्या हृदयसम्राटाचे स्थान संपादन केले होते. त्यांच्या इतकी जनमानसात अफाट लोकप्रियता संपादन केलेला कोकणात अन्य कोणी नेता माझ्या पाहण्यात नाही. नाथ पै यांनीदेखील कोकणच्या भूमीवर आणि कोकणवासीयांवर अखेरपर्यंत अतूट अलौकिक आणि अविस्मरणीय प्रेम केले.

## जुलमी नगरवाल्याची उचलबांगडी

लोकसभेतील पहिल्याच भाषणात बॅ.नाथ पै यांनी एका जुलमी शासकीय अधिकाऱ्याने कोकणत्या एका भागात चालविलेल्या जुलमांना वाचा फोडली होती. त्यावेळी गोव्याची आर्थिक नाकेबंदी करण्यासाठी आणि गोवा सरहद्दीवर त्या काळात मोठ्या प्रमाणात चालणाऱ्या चोरट्या व्यापाराला (प्रामुख्याने सोन्याच्या) प्रतिबंध करण्यासाठी प्रवासी वाहतुकीवर निर्बंध जारी केले होते. भारत सरकारने नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांच्या परवानगीशिवाय कोणाही व्यक्तीला गोव्यात जाता येत नसे अगर गोव्यातून इकडे येता येत नसे. संपूर्ण गोवा सरहद्दीवर राखीव पोलीस दलाचा जागता आणि फिरता पहारा बसविण्यात आला होता. या राखीव दलाचे वरिष्ठ अधिकारी डी.आय.जी. श्री. नगरवाला होते. हा अधिकारी अत्यंत अरेरावी आणि जुलमी स्वभावाचा होता. गोवा सरहद्दीवरती वाहतुकीला प्रतिबंध करणारे कसल्याही प्रकारचे कुंपण नव्हते. त्यामुळे शेतीच्या कामाच्या निमित्ताने गोवा सरहद्दीवर लगतच्या शेतकऱ्यांची सतत वर्दळ असे. बरेच वेळा सरहद्दीवरील शेतकऱ्यांची जनावरे चरण्यासाठी गोवा हद्दीत जात, त्यांना परतवून आणण्यासाठी शेतकऱ्यांनाही अधून-मधून गोवा हद्दीत जावे लागत असे. गोवा सरहद्दीवरील अशा निष्पाप ग्रामस्थांना पोलीस ठाण्यावर बोलावून आणून अकारण शिवीगाळ करून

अमानुष मारझोडीचे सत्र डी.आय.जी. नगरवाल्याने सुरू केले होते. सावंतवाडी तालुक्यातील बांदे गावचे समाजवादी पक्षाचे क्रियाशील, प्रामाणिक कार्यकर्ते साथी नाना तारी यांचीही नगरवाला यांनी अकारण सतवणूक केली होती. डी.आय.जी नगरवाला यांच्या जुलमी वर्तनाने गोवा सरहद्दीवरील रहिवासी त्रस्त व हवालदील झाले होते. डी.आय.जी. श्री. नगरवाल हे मुंबई प्रांताचे तत्कालीन मुख्यमंत्री नामदार मोरारजी देसाई यांच्या मर्जीतले असल्याने नगरवालांच्या विरोधात नागरिकांनी नोंदविलेल्या तक्रारींची दखल राज्यसरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडूनही घेतली जात नसे. त्यामुळे आपले कोणीच काही करू शकणार नाही अशा गुर्मीत ते सदैव वावरत असत.

बॅ. नाथ पै यांची लोकसभेवर निवड झाल्यावर डी.आय.जी. नगरवाला यांची जुलूमशाही आम्ही नाथ पै यांच्या नजरेस आणली. ज्यांना डी.आय.जी. नगरवाला यांनी मारझोड केली होती अशा व्यक्तींची आम्ही सावंतवाडीत नाथ पै समवेत भेट घडवून आणली. या लोकांच्या कहाण्या ऐकून नाथ पै व्यथित झाले आणि म्हणाले, "अशा प्रकारचे जुलूम जर येथे चालले असतील तर गोव्यातील सालाझारच्या राजवटीत आणि आमच्या येथील राजवटीत फरक तो काय राहिला?" या कहाण्या ऐकून घेतल्यावर तत्कालीन पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू आंना सादर करण्यासाठी निरपराध ग्रामस्थांना अकारण अमानुष झालेल्या मारझोडीबद्दल मला तारीखवार व तपशीलवार सविस्तर अर्ज तयार करायला लावला व मारझोड झालेल्या सर्व ग्रामस्थांच्या त्यावर सह्या घेतल्या. येथून जाण्यापूर्वी नाथ पै यांनी अर्जदारांना सांगितले, "पंधरा दिवसात नगरवाल्याची उचलबांगडी करायला लावली नाही तर सावंतवाडीत परत पाऊल टाकणार नाही." दिल्लीला गेल्यावर सदर अर्जाला आपले पत्र जोडून तो अर्ज पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांची भेट घेऊन त्यांच्या हाती दिला. त्यावेळी लोकसभेचे अधिवेशन सुरू होते. नाथ पै यांनी आपल्या लोकसभेतील पहिल्या भाषणातून दोवा सरहद्दीवरील ग्रामस्थांच्या जुलमाला वाचा फोडली. पं. जवाहरलाल नेहरूना या संदर्भात ग्रामस्थांच्या अर्जासमवेत दिलेल्या पत्रात आपल्या जुलमी वर्तनाने भारत सरकारची प्रतिमा जनमानसात कलंकित करणाऱ्या डी.आय.जी. नगरवाल्याची तेथून उचलबांगडी करण्याची मागणी केली होती. नेहरूंनी नाथ पै यांच्या पत्राची गंभीरपणे दखल

घेऊन डी.आय.जी. नगरवाल्याची तत्काळ बदली केली. खासदार म्हणून निवडून आल्यावर लोकांना दिलेल्या पहिल्या आश्वासनांची बॅ. नाथ पै यांनी पूर्तता केली.

## मोचेमाडच्या खाडीवरील पूल

बॅ. नाथ पै यांचे आपल्या मतदारसंघातील घडामोंडीकडे किती लक्ष असे याचे उदाहरण या ठिकाणी देत आहे. बॅ. नाथ पै यांच्या मतदारसंघातील वेंगुर्ले ते शिरोडा या मार्गावरील मोचेमाडच्या खाडीत होडी उलटून लग्नाचे एक वऱ्हाड बुडाले. नवविवाहित वधु-वरांसह या अपघातात वरातीतील काही व्यक्तींचा अंत झाला. त्यावेळी महाराष्ट्र टाईम्समध्ये पहिल्या पृष्ठावर ही बातमी प्रसिद्ध झाली होती. नाथ पै यांनी दिल्लीत ही बातमी महाराष्ट्र टाईम्समध्ये वाचली आणि तात्काळ वेंगुर्ले गाठले. होडी उलटून झालेल्या अपघातात मृत्यू पावलेल्यांच्या नातेवाईकांच्या भेटी घेऊन त्यांनी त्यांचे सांत्वन केले.

पण नाथ पै एवढ्यावरच थांबले नाहीत. दिल्लीत परत जाताना मुंबईत सार्वजनिक बांधकाम खात्याच्या सचिवांची त्यांनी भेट घेतली आणि. "आणखी किती लोकांचे बळी घेतल्यावर सरकार मोचेमाडच्या खाडीवर पूल बांधणार आहे?" असा सवाल त्यांनी सतिवाला विचारला. नाथच्या प्रयत्नामुळे सरकारी यंत्रणा तत्काळ हलली. पंधरा दिवसांनी सार्वजनिक बांधकाम खात्याचे मुख्य सचिव, मुख्य अभियंता, अधिक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता यांनी अपघात स्थळाची पाहणी केली. त्यांच्यासमवेत नाथ पै होतेच.जागेची पाहणी करून पुलाची जागा निश्चित करण्यात आली. पुलाचे प्लॅन, एस्टिमेट तयार करून त्याला प्रशासकीय मान्यता देण्यात आली. दुर्दैवाने काही जमीन मालतांनी संमतिपत्राने जमिनी दिल्या नाहीत. त्यामुळे जमीन संपादन करावी लागली. पण जमीन संपादनासाठी अवाजवी विलंब लागल्याने नाथ पै यांच्या हयातीमध्ये हा पूल काही पूर्ण होऊ शकला नाही. नाथ पै यांच्या मृत्यूनंतरच हा पूल पूर्ण झाला. नाथ पै यांच्या स्मरणार्थ पुलाला नाथ पै यांचे नाव देण्यात आले आहे.

## भजनी मंडळाच्या अपघाताची दुर्घटना

भजने हा कोकणवासीयांचा देवाच्या उपासनेचा आवडता प्रकार आहे. कोकणात वाड्यावाड्यातून भजनी मंडळे आहेत. प्रत्येक भजनी मंडळाकडे बाज्याची पेटी, तबला, मृदुंग, झांजा आदी साहित्य असते. गणेश चर्तुथी हा कोकणवासीयांचा आवडता सण. गणेश उत्सवात गावागावातून, वाड्यावाड्यातून भजनांना बहर येतो. 'भजनी बाऱ्या' हा कोकणवासीयांचा असाच आवडता छंद आहे. भजनीबारी म्हणजे दोन भजनी मंडळातील स्पर्धा असते. भजनातूनच ही भजनी मंडळे परस्परांना सवाल-जबाब घालीत असतात. कोकणात त्याला 'डबलबारी' असेही म्हणतात. गणेशोत्सवाच्या निमित्ताने गावागावातून भजनीमंडळाच्या अशा स्पर्धाही होतात. कणकवलीत गणेशोत्सवाच्या निमित्ताने बंदिस्त ट्रकमधून निघालेल्या भजनी मंडळाच्या ट्रकला भीषण अपघात झाला. गड नदीनजीक ट्रकाच्या ड्रायव्हरला गाडीचा तोल सांभाळता आला नाही आणि गाडी रस्ता सोडून खाली २०-२५ फूट खड्यात कोसळली. ट्रकमधील भरगच्च भजनी मंडळीतील १८-१९ जणांचे चेंगरून निधन झाले. नाथला दिल्लीला ही घटना कळताच नाथ पै यांनी तत्काळ कणकवली गाठली आणि अपघातात मृत्यू पावलेल्यांच्या नातेवाईकांचे सांत्वन केले.

## वादळग्रस्तांना मदत

२४ मे १९६१ हा दक्षिण रत्नागिरीतील रहिवाशांचा काळा दिवस ठरला. त्या दिवशी दक्षिण रत्नागिरीला चक्रीवादळाने अक्षरशः झोडपले, प्रचंड नुकसान झाले. नाथचा मुक्काम त्यावेळी बेळगांवला होता. रात्रौ आकाशवाणीवरील बातम्यात दक्षिण रत्नागिरीत त्याच्या राजापूर मतदारसंघामध्ये चक्रीवादळाने केलेल्या कहराचे वृत्त नाखने ऐकले आणि दुसऱ्या दिवशी उजाडताच नाथ पै सावंतवाडीत हजर झाले. मला म्हणाले, “चल वेंगुर्ल्याला जाऊया.” मी म्हटले, “आपण जाणार कसे? रस्त्यावर झाडे पडून वाहतूक बंद झाली आहे.” नाथ म्हणाले, “सायकलने जाऊया.” आम्ही दोन सायकली घेल्या आणि वेंगुर्ल्यात जावयास निघलो, एऱ्व्ही सायकलने वेंगुर्ल्याच जावयास ता सव्वातास लागत असे. पण रस्त्यावर पडलेल्या झाडामुळे आम्हाला वेंगुर्ल्यात पोहोचण्यास सहा तास लागले. काही ठिकाणी आम्हाला सायकली अक्षरशः डोक्यावर उचलून घ्याव्या लागल्या. वाटेत ठिकठिकाणी रस्त्यालगत ग्रामस्थांना सभा घेऊन नाथने सरकारी यंत्रणाला रस्ता मोकळा करण्यास वेळ लागले, तेव्हा सरकारी यंत्रणेवर अवलंबून न राहाता ग्रामस्थांना रस्त्यावरील झाडे तोडून बाजूला करून रस्ता मोकळा करण्याचे आवाहन केले. दुपारनंतर आम्ही वेंगुर्ल्यात पोहोचलो त्यावेळी दिवसभराच्या सायकलच्या प्रवासाने नाथ अतिशय थकले होते. तेव्हा त्या दिवशी वेंगुर्ल्यात मुक्का करून दुसऱ्या दिवशी पुढे जायचे ठरले. दुसऱ्या दिवशी सावंतवाडीत माझे महत्त्वाचे काम असल्याने मी नाथला, वेंगुर्ल्यात कार्यकर्त्यांच्या स्वाधीन करून मी सावंतवाडीत सायकलने परतायचे ठरविले. परतीच्या प्रवासात मला सायकल कोठेही डोक्यावर घ्यावी लागली नाही. नाथ पैंच्या आवाहनाला साथ देऊन गावगोवच्या ग्रामस्थांनी काही तासातच आपापल्या गावातील रस्ता मोकळा केला होता. दुसऱ्या दिवसापासून नाथने चक्रीवादळाचा फटका बसलेल्या भागात दौरा पूर्ण केला. हा दौरा संपवून नाथ पै तातडीने दिल्लीला रवाना झाले. दिल्लीला जाताना वाटेत मुंबईत त्यांनी मुख्यमंत्र्यांची भेट घेऊन वादळाने झालेल्या नुकसानीची त्यांना माहिती दिली आणि वादळग्रस्त शेतकऱ्यांना बागायतदारांना शासनातर्फे भरपाई देण्याची

विनंती केली. दिल्लीला गेल्यावर नाथ पै यांनी पंतप्रधानांचीही भेट घेतली आणि चक्रीवादळाने कोकणात केलेल्या कहराची त्यांनाही कल्पना दिली. पण तोपर्यंत महाराष्ट्र सरकारकडून या नैसर्गिक आपत्तीची केंद्रसरकारला कसलीही माहिती देण्यात आली नव्हती. पण नाथ पै यांच्या प्रयत्नामुळेच त्यावेळी कोकणातील वादळग्रस्त शेतकऱ्यांना व बागायतदारांना प्रथमच अल्पप्रमाणात का होईना नुकसान भरपाई मिळाली.

## दशावतारी नाट्यकला व कलावंताना प्रोत्साहन

दशावतारी नाट्यकला हे दक्षिण कोकणचे खास वैशिष्ट्य आहे. सिंधुदुर्ग आणि गोवा भागातील ही खऱ्या अर्थाने लोककला आहे. बारस म्हणजे तुळशीचे लग्न झाले की दक्षिण कोकणात जत्रोत्सव सुरू होतात. गावातील देवालयाच्या आवाकात लोकाश्रयावर हे जत्रोत्सव साजरे केले जातात. मध्यरात्रीनंतर अशा जत्रोत्सवातून लोकरंजनासाठी आणि सुसंस्कारासाठी ही दशावतारी नाटके केली जातात. आता ही संख्या खूपच वाढली आहे. जत्रोत्सवात दशावतारी नाटक करणाऱ्या मंडळासा ग्रामस्थांतर्फे भोजनासाठी शिधा म्हणजे तांदूळ, डाळ, मसाला, मिरची, तेल आणि रोख बिदागी दिली जात असे. त्याकाळी दशावतारी नाट्यमंडळाचे मालकचालक कलावंताना सिझनचा मेहनताना ठरवून देत असत. पणी अलीकडच्या काळात त्यात काही प्रमाणात बदल झाला असून खेळावर मोबदला देण्याची पद्धतही सुरू झाली आहे. दशावतारी नाटकांचे संवाद लिखित स्वरूपात नसतात. प्रसंगानुरूप कलाकार उत्स्फूर्त संवाद करीत असतात. नाटकातील स्त्रियांच्या भूमिचा पुरुषच करतात, नाटकाचे कथानक मात्र रामयण, महाभारत व पौराणिक कथांतून घेतले जाते. कथाही निवडताना सर्वसाधारणपणे सुसंस्काराच्या निवडल्या जातात, त्यामुळे लोकरंजनाबरोबरच समाजात सुसंस्कार रूजविण्याचे मोलाचे कार्य दशावतारी नाटकांनी कोकणात केले आहे.

तमाशी ही महाराष्ट्राची लोककला मानली गेली आहे. शासकीय पातळीवर तमाशाच्या राज्यस्तरीय स्पर्धा घेऊन महाराष्ट्र शासन तमाशासारख्या लोककलेला प्रोत्साहन देत आले आहे. दक्षिण कोकणातील

दशावतारी नाटके ही कोकणची लोककला असूनही त्यांना त्याकाळात शासनमान्यता प्राप्त झालेली नव्हती. याबद्दल नाथ पैना अतिशय खंत वाटत असे. दशावतारी नाटकांविषयी आणि दशावतारी कलेविषयी त्यांना उपजत उत्सूर्त विलक्षण जिव्हाळा होता. दशावतारी कलावंतांविषयी त्यांच्या मनात आदराची भावना होती. दशावतारी नाटकांना आणि कलावंतांना शासन मदत व प्रोत्साहन द्यायला तयार नसेल तर आपण द्यायला हवे या भूमिकेतून नाथ पै यांनी प्रथमच दशावतारी नाटकांच्या स्पर्धा आयोजित केल्या. त्यासाठी नाथ पै यांच्या अध्यक्षतेखाली एक स्थायी समितीही स्थापन करण्यात आली होती. वेंगुर्ल्याचे वासू देशपांडे या समितीचे कार्याध्यक्ष होते व कार्यवाह म्हणून माझी निवड झाली. पहिल्या वर्षी वेंगुर्ले, दुसऱ्या वर्षी सावंतवाडी आणि तिसऱ्या वर्षी वालावल येथे अशी तीन वर्षे या स्पर्धा झाल्यानंतर सावंतवाडीच्या कामगार कल्याण केंद्रामार्फत या स्पर्धा सुरू करण्यात आल्याने समितीचने स्पर्धा घेण्याचे थांबविले. सावंतवाडीच्या कामगार कल्याण केंद्राच्यावतीने सुरू करण्यात आलेल्या या स्पर्धा २५ वर्षाहून अधिक काळ घेतल्या जात आहेत. पण या स्पर्धांची सुरुवात बॅ. नाथ पै यांच्या प्रेरणेने झाली आहे.

## बॅ. नाथ पैंच्या नेतृत्वाखाली पहिली कोकण विकास परिषद

बॅ. नाथ पै यांनी कोकणच्या विकासाचा ध्यास घेतला होता. कोकणची शासनाकडून होणारी उपेक्षा थांबवून कोकणला विकासाठी झुकते माप दिले जावे याच्यासाठी शासनावर दबाव आणणे अनिवार्य होते. यासाठी कोकणातील सर्व राजकीय पक्षांनी आपले वैचारिक मतभेद बाजूला सारून एका व्यासपीठावर येऊन एकत्रितपणे काम करणे आवश्यक होते. बॅ. नाथ पै यांनी कोकण विकास परिषदेच्या रूपाने असे व्यासपीठ निर्माण करण्यास प्रोत्साहन दिले.

कोकण विराल परिषदेचे पहिले अधिवेशन २१ फेब्रुवारी १९५९ रोजी बॅ. नाथ पै यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईत संपन्न झाले. कोकणचे एक सुपुत्र सारस्वत बँकेचे संस्थापक श्री. वामनराव वर्दे या परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. कोकणचे ज्येष्ठ साहित्यिक आणि कवी मंगशे पाडगांवकर यांच्या "हिरवे

कोकण” या गीताने या परिषदेचा शुभारंभ झाला. महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. यशवंतराव तव्हाण यांनी परिषदेचे उद्घाटन केले. उद्घाटनसमयी केलेल्या भाषणात इतर जिल्ह्याच्या विकास योजनेत शिल्लक राहिलेल्या निधीतील १ कोटी रुपये कोकणच्या विकासवर खर्च करण्यात येतील असे त्यांनी जाहीर केले.

बॅ. नाथ पै यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात कोकणने आतापर्यंत महाराष्ट्राची आणि देशाची कशी सेवा केली हे विस्ताराने सांगून कोकणच्या विकासासाठी पुढील सूचना केल्या.

१) कोकणच्या विकासासाठी डेव्हलपमेंट ॲथॉरिटी निर्माण करावी.
२) तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत कोकण रेल्वेचे काम पूर्ण करावे.
३) कोकण किनाऱ्यावर आगबोट वाहतूक सुरू ठेवण्यास आगबोट कंपनीला भाग पाडावे.
४) बारमाही बंदरे कोणती करता येतील याची पाहणी करून अशी बंदरे लवकरात लवकर बारमाही करावीत.
५) कोकणवासीयांच्या डोक्यावरून जाणारी कोयनेची वीज कोकणच्या वाट्यालाही देणयात यावी.
६) काजू धंद्याच्या विकासासाठी खास प्रयत्न करण्यात यावेत.
७) मच्छीमार व छोटे मोठे उद्योग संघटित व सहकारी क्षेत्रात सुरू करण्यास प्रोत्साहन द्यावे.
८) कोकणात खनिज व प्रक्रिया उद्योग सुरू करण्यास उत्तेजन द्यावे.

आपल्या भाषणात कोकणी युवकाला उपजीविकसेसाठी कोकणच्या बाहेर जावे लागणार नाही अशी परिस्थिती कोकणात निर्माण करावी असे आवाहन नाथ पैनी आपल्या भाषणाच्या अखेरीस केले.

कोकण विकास परिषदेचे हे पहिले अधिवेशन कोकणचा आवाज उठविण्यात यशस्वी ठरले.

दुसरी कोकण विकास परिषद नाथ पै यांचा जन्म गावी वेंगुर्ले येथे १७ व १८ डिसेंबर १९६० रोजी संपन्न झाली. महाराष्ट्र विधान परिषदेचे सभापती नामदार नानासाहेब कुंटे या परिषदेचे अध्यक्ष होते, वेंगुर्ल्याचे नगराध्यक्ष

रमाकांत कुबल परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. कोकणचे सुपुत्र केंद्रीय मंत्री नामदार स. का. पाटील परिषदेचे उद्घाटक होते.

बॅ. नाथ पै यांनी आपल्या अध्यक्षपदाचे अधिकारी नवनिर्वाचित अध्यक्ष श्री. नानासाहेब कुंटे याच्या स्वाधीन केले. याप्रसंगी बॅ नाथ पै म्हणाले, “नामदार स. का. पाटील यांनी परिषदेच्या उद्घटनाची जबाबदारी स्वीकारून परिषदेच्या कार्याला बळकटी आणली आहे. नामदार स. का. पाटील यांचे कार्य म्हणजे सत्यभामेच्या उद्यानात पारिजातकाचे झाड; पण त्यांची फुले मात्र रुक्मिणीच्या अंगणात, अशा प्रकारचे आहे. यापुढे तरी नामदार स. का. पाटील यांनी कोकण विकास परिषदेच्या भावी कार्याला सहकार्य देऊन कोकणच्या समस्या सोडविण्यास पुढाकार घ्यावा.” अशी अपेक्षा नाथ पै यांनी आपल्या भाषणात व्यक्त केली.

नामदार स. का. पाटील यांना त्यांच्या भाषणाची दखल घ्यावीच लागली. उद्घाटनसमयी केलेल्या भाषणात नामदार स. का. पाटील म्हणाले, “सत्यभामेच्या उद्यानात पारिजातकाचे झाड आणि फुले रुक्मिणीच्या अंगणात हे रूपक लागू होत नाही हे मी प्रांजळपणे सांगतो, कारण कोकणात रूजलेले हे झाड बाहेरच्या प्रदेशाची सेवा करीत असले तरी त्याची पाळे, मुळे कोकणातच रूजलेली आहेत हे विसरून चालणार नाही. ‘चराती चरतो भगः’ या सुभाषिताप्रमाणे स्वतः जागरूक राहून आपल्या कार्याचा पाठपुरावा जे करतील त्यांनाच दैव व सरकारही प्रतिसाद देईल.”

परिषदेचे अध्यक्ष नामदार नानासाहेव कुंटे यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात कोकणच्या विविध समस्यांची माहिती देऊन त्या सोडविण्यासंबंधी ऊहापोह केला. कोकणच्या विकासाच्या विविध योजनांविषयी आकडेवार माहिती देऊन त्यांनी कोकण विकासाचे सम्यक स्वरूप स्पष्ट केले. परिषदेत पहिल्या अधिवेशनातील कोकण डेव्हलपमेंट ॲथॉरेटी, कोकण रेल्वे, आगबोट वाहतूक, बंदरे व रस्ते वाहतूक विकास आदी ठरावांचा पाठपुरावा करण्यात आला.

तिसरी कोकण विकास परिषद दि. २३ व २४ मे १९६४ रोजी कुलाबा (रायगड) जिल्ह्यातील पेण येथे संपन्न झाली. महाराष्ट्रातील प्रसिद्ध उद्योगपती श्री. लालचंद हिराचंद यांची परिषदेच्या अध्यक्षपदी निवड

करण्यात आली होती. श्री. लालचंद हिराचंद यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात कोकणच्या औद्योगीक विकासाची चर्चा केली आणि खुल्या व्यापाराचा पुरस्कार केला. महाराष्ट्राचे तत्कालीन शिक्षणमंत्री नामदार मधुकरराव चौधरी यांच्या हस्ते परिषदेच्या स्मरणिकेचे प्रकाशन करण्यात आले. नामदार मधुकरराव चौधरी यांनी याप्रसंगी केलेल्या भाषणात परिषदेचे अध्यक्ष लालचंद हिराचंद यांच्या भाषणाचा खरपूस समाचार घेतला.

त्यानंतर केलेल्या भाषणात बॅ. नाथ पै यांनी कोकणची दुःखे व शासनाची बेपर्वाई पुराव्यानिशी सादर करून नाथ पै म्हणाला, "श्री. लालचंद हिराचंद आणि मधुकरराव चौधरी यांचे भांडण लटकेच आहे. कोकणाकडे सहानुभूतीचा प्रचंड ओघ वळला असला तरी कोकणचे पातेले अद्यापि रिकामेच आहे. आमच भूतकाळ उज्ज्वल होता, परंतु वर्तमानकाळ कमी तापाचा आणि भविष्यकाळ थोडा सुखाचा व्हावा." अशी अपेक्षा व्यक्त करून नाथ पै पुढे म्हणाले, "पहिल्या कोकण विकास परिषदेमध्ये महाराष्ट्राचे त्यावेळचे मुख्यमंत्री नामदार यशवंतराव चव्हाण यांनी कोकणच्या विकास परिषदेमध्ये महाराष्ट्राचे त्यावेळचे मुख्यमंत्री नामदार यशवंतराव चव्हाण यांनी कोकणच्या विकासावर अतिरिक्त १ कोटी रु. खर्च करण्यात येतील असे आश्वासन दिले होते. परंतु महाराष्ट्र राज्य विधिमंडळाच्या अंदाज समितीने ही रक्कम कशावर खर्च झाली अशी विचारणा करून १५ महिन्यांचा कालावधी लोटला असता तरी सरकारने अद्यापही स्पष्टीकरण केलेले नाही. बंदर विकासावर ४० लाख रु. खर्च व्हायचे होते पण प्रत्यक्षात ९ लाखाच रुपये खर्च झाले आहेत. वेंगुर्ले बंदरात गाळ काठणारा ड्रेजर गाळ किनाऱ्यावर काढून टाकतो तो पावसात पुन्हा बंदरात जाऊन साचतो. लक्षावधी रुपये अक्षरशः पाण्यात जातात. राजापूर तालुक्यात एक लक्ष बारा हजार वस्ती; पण सबंध तालुक्या तीनच तार ऑफिस. पाचवे तार ऑफिस फायद्यात नाही म्हणून सहा हजार रुपये भरा असा पोस्टखात्याचा ग्रामस्थांना तगादा. पोस्ट आणि तार कचेऱ्या सुद्धा कोकणात पुरेशा नाहीत. इतर दळणवळणाच्या साधनांची तर गोष्टच सोडा. गोवा कोकणच्यालगतचा भाग. पण केंद्र सरकारची भूमिका पक्षपातीपणाची आहे. महाराष्ट्र सरकार बंडखोरीची भाषा वापरते; पण केंद्रापुढे निर्धाराने राहाण्याऐवजी लोटांगण

घालते. महाराष्ट्र सरकारनेही करणखर भूमिका घेतली पाहिजे." असे आवाहन नाथ पै यांनी आपल्या भाषणात केले.

बॅ. नाथ पै यांचे भाषण इतके प्रभावी झाले की, त्यानंतर महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचे सरचिटणीस श्री. मोहन धारिया यांनी केलेल्या भाषणात मुंबई-गोवा रस्ता, कोकण रेल्वे, बंदर विकास आदी प्रश्नांचे बाबतीत महाराष्ट्रातील खासदार बॅ. नाथ पै यांच्या पाठीशी राहातील असे आश्वासन दिले.

परिषदेत पूर्वीचेच ठराव झाले, कारण प्रमुख मागण्या अजून मान्य झाल्या नव्हत्या.

१९६९ मध्ये मुंबईत चौथ्या कोकण विकास परिषदेची तयार सुरू झाली त्यावेळी बॅ. नाथ पै दिल्लीत आजारी होते. या परिषदेचे उद्‌घाटन नियोजन मंडळाचे उपाध्यक्ष डॉ. धनंजयराव गाडगीळ करणार होते. तर प्रमुख अतिथी म्हणून भारताचे माझी अर्थमंत्री श्री. चिंतामणराव देशमुख उपस्थित राहणार होते. डॉक्टरनी नाथला पूर्ण विश्रांतीचा सल्ला दिला होता. पण तो न मानता नाथ परिषदेला येण्यास निघाले तेव्हा डॉक्टरनी नाथला सांगितले, "तुम्ही जाणारच असाल तर आमच्या परवानगीशिवाय जात आहात असे लिहून द्या." नाथने पे घेतले आणि लेटर पॅडवर त्याप्रमाणे लिहून दिले. परिषदेसाठी नाथ पै निघाले खरे, पण विमानाची तिकीटे मिळाली नव्हती. नाथ पै यांनी तत्कालीन वाहतूक मंत्री डॉ. करणसिंग यांचेशी दूरध्वनीवरून संपर्क साधला आणि तिकीटे मिळविली.

मुंबईत नाथ पै श्री. बाबुराव आडारकर यांचेकडे उतरत असत. नाथची खालावलेली प्रकृती पाहून आडारकरांनी मुंबईतील विख्यात हृदयरोग तज्ज्ञ डॉ. दाते यांना बोलावून घेतले. त्यांनी तपासून नाथने परिषदेला जाऊ नये असा सल्ला दिला. श्री. चिंतामणी देशमुख यांनीही नाथला फोन करून "तुम्ही येऊ नका, आम्ही परिषद यशस्वी करू." असे कळविले. पण नाथ पै कुणाचेही ऐकण्याच्या मनःस्थितीत नव्हते. ते ठरल्याप्रमाणे परिषदेला उपस्थित राहाण्यास निघाले.

आदल्या दिवशी मुंबईत पाऊस पडला होता. तेव्हा परिषद शिरोडकर सभागृहांत घेण्याचे ठरले. नाथ पै हळूहळू जिने चढत सभागृहात हजर झाले. सभागृह भरगच्च भरले होते. परिषदेला सभागृह अपुरे पडत आहे हे पाहून

परिषद जवळच्या नरेपार्क मैदानात घेण्याचे सुचविले. ती सर्वांना पसंत पडल्याने परिषदेला आलेले प्रतिधी नरेपार्ककडे निघाले. नाथ पैंना जिने चढण्या-उतरण्याचा त्रास होऊ नये म्हणून डॉ. पी. व्ही. मंडलिक यांनी नाथला खुर्चीसह व्यासपाठीवर घेऊन जाण्याची सूचना केली. तेव्हा नाथ पैंनी लगलेच सांगितले, नाही. चौघांच्या खांद्यावरून एकदाच जावयाचे. आता नाही."

ठरल्याप्रमाणे परिषदेचे उद्‌घाटन डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनी केले. नाथ पै आपल्या भाषणांत म्हणाले, "महाभारत सांगतो, कर्तव्य करीत असताना मरण आले तर येऊ द्या. म्हणून मी परिषदेसाठी आलो. कर्तव्यपालनासाठी मी परिषदेला उपस्थित झालो आहे. विकासाच्या दृष्टीने कोकण हा एक स्वतंत्र भाग मानला गेला पाहिजे. त्यासाठी विनाविलंब महामंडळा नेमले पाहिजे. ग्रामपंचायतीपासून लोकसभेपर्यंत या मागणीचा पाठपुरवा केला पाहिजे. संघर्षाची निर्धाराने तयारी केली पाहिजे. आपण या मार्गाने जाऊया. यश सावलीसारखे आपल्या मागे येईल."

माजी अर्थमंत्री श्री. चिंतामणी देशमुख आपल्या भाषणात म्हणाले, "केवळ महामंडळ नेमून भागणार नाही. योजनाबद्ध कार्यक्रम राबविला जातो आहे की नाही हे पाहावे लागेल. त्यासाठी नाथ दहा-पंधरा वर्षे लोकसभेत पाहिजेत. म्हणून ते आजच्या परिषदेला आले नाहीत तरी चालेल असे आपण म्हणालो."

या परिषदेनंतर कोकण विकासासाठी आंदोलनाची पूर्वतयारी चालविली होती. पण दरम्यानच्या काळात बांगला देशाच्या लढाईत भारत देश गुंतला असल्याने देशांतर्गत आंदोलनास अनुकूल वातावरण नव्हते. बांगला देशातील विजयानंतर काँग्रेस पक्षाच्या विभाजनाने लोकसभेत अल्पमतात आलेल्या पंतप्रधान इंदिरा गांधीनी लोकसभा बरखास्त करून लोकसभेच्या मध्यावधी निवडणुकीला सामोरे जाण्याचा निर्णय घेतला. दुर्दैवाने लोकसभेच्या निवडणुकीपूर्वीचे १८ जानेवारी १९७१ रोजी मध्यरात्री बॅ. नाथ पै यांचे निधन झाल्याने कोकण विकास परिषद पोरकी झाली.

कोकण विकास परिषदांची फलश्रुती काय? असा प्रश्न चिकित्सक कोकणवासीयांकडून विचारला जातो. पण त्यानंतरच्या काळात महाराष्ट्र

शासनाने विभागीय विकास महामंडळे स्थापन करण्यचा निर्णय घेतला त्यावेळी कोकणची सांगड पश्चिम महाराष्ट्राशी न घालता कोकणासाठी स्वतंत्र कोकण विकास महामंडळ स्थापन केले. तसेच ७२० किलोमीटर लांबीच्या समुद्र किनारपट्टीवर मत्स्योद्योगाच्या विकासासाठी मत्स्योद्योग विकास महामंडळाची निर्मिती केली. ही खरी कोकण विकास परिषदांची फलनिष्पत्ती आहे. पण बॅ. नाथ पै यांची कोकण डेव्हलपमेंट ॲथॉरिटीची संकल्पना आणि महाराष्ट्र शासनाने दिलेले कोकण विकास मंडळ यात खूपच तफावत होती. नाथ पै यांची कोकण डेव्हलपमेंट ॲथॉरिटीची कल्पना घटनात्मक तरतूद असलेल्या कोकण वैधानिक विकास मंडळाशी मिळतीजुळती होती.

बॅ. नाथ पै यांच्या मृत्यूनंतर कोकण विकास परिषदेला प्रभावी नेतृत्त्व न लाभल्याने कोकण विकास परिषद विष्प्रभ झाली.

## भूमी मुक्ती अभियान

सरकारी पड जमिनीचे भूमिहीन शेकऱ्यांना वाटप करावे या मागणीसाठी प्रजासमाजवादी पक्षाने देशव्यापी भूमि-मुक्ती अभियानाचे आयोजन केले होते. या अभियानाच्या पूर्वतयारीसाठी ठिकठिकाणी शेतकरी परिषदा घेण्यात आल्या होत्या. नाथ पै यांच्या राजापूर मतदारसंघात वेंगुर्ले तालुक्यातील उभादांडा येथे ५ फेब्रुवारी १९६८ रोजी अशीच शेतकरी परिषद घेण्यात आली होती. उभादांड्याचे सुपुत्र माजी आमदार श्री. नारायणराव चमणकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या शेतकरी परिषदेला शेतकऱ्यांनी प्रचंड गर्दी केली होती. परिषदेचे उद्‌घाटनसमयी केलेल्या भाषणात बॅ. नाथ पै म्हणाले, “कराड-साताऱ्याला एक न्याय; तर कोकणला दुसरा न्याय हे यापुढे खपवून घेतले जाणार नाही असा निर्धार कोकणातील शेतकऱ्यांनी केला पाहिजे. माझे एक मित्र नेहमी म्हणत असतात, ‘पूर्वजन्माचे पाप म्हणून आम्ही कोकणात जन्म घेतला!’ पण हे खरे नाही. कोकणात जन्माला येणे म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकर, महर्षी धोंडो केशव कर्वे, लोकमान्य टिळक, भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर, परमपूज्या साने गुरुजी आदी कोकणी सुपुत्रांच्या जन्मभूमीत जन्म घेणे. मी कोकणात जन्मलो याचा मला अभिमान वाटतो. देव

माझ्यावर प्रसन्न झाला तर देवाली मी सांगेन, दे जन्म मला फिरुनी माझ्या कोकणात.”

कोकणावर निसर्गाता वरदहस्त असल्याचे सांगून बॅ. नाथ पै पुढे म्हणाले, “नैसर्गिकदृष्टीने समृद्ध असलेल्या कोकणाला राज्यकर्त्यांनी निष्क्रियतेने आणि पक्षघाती वर्तनाने कंगाल बनविले आहे. याविरूद्ध आता समस्त कोकणवासीयांनी एकजुटीने पेटून उठले पाहिजे.” असे आवाहनही नाथ पै यांनी याप्रसंगी केले.

या जिल्ह्यात माणगाव खोर्‍यात हजारो एकर आकारी पड जमीन आहे. ही जमीन त्या जमिनीतील एक साली कसवटदारांना वाटावी अशी मागणी करणारा ठरावही या परिषदेत करण्यात आला.

भूमि मुक्ती अभियानामध्ये या जिल्ह्यात माणगांव, वेंगुर्ले (कॅम्प), शिरोडा इत्यादी ठिकाणी सरकारी जमिनीच्या वाटपासाठी सत्याग्रह आयोजित करण्यात आले होते. पण पक्षाच्या आदेशानुसार नाथ पै यांनी मुंबईत शासकीय जमिनीवर सत्याग्रह केला.

## कोकण रेल्वेची पूर्वतयारी

कोकण रेल्वे हे समस्त कोकणवासीयांचे स्वप्न होते. नाथ पै यांनी लोकसभेत आणि लोकसभेच्या बाहेरही कोकण रेल्वेचा सतत पाठपुरावा चालविला होता.

काँग्रेस पक्षाच्या विभाजनानंतर पंतप्रधान इंदिरा गांधी लोकसभेत अल्पमतात आल्या होत्या. ही संधी साधून २२ डिसेंबर १९६९ रोजी बॅ. नाथ पै यांनी रेल्वेच्या पुरवणी मागण्यांना त्यांत कोकण रेल्वेच्या सर्व्हेक्षणासाठी तरतूद नसल्याबद्दल एक रुपयाची कपात सूचना सुचविली होती. संसदीय क्षेत्रात एक रुपयाच्या कपात सूचनेला फार महत्त्व असते. अशी कपात सूचना मंजूर झाली तर तो मंत्रीमंडळावर अविश्वास मानला जातो आणि मंत्रीमंडळावर राजीनामा देण्याची आपत्ती ओढवते. इंदिरा गांधीच्या सुदैवाने आणि नाथ पै यांच्या दुर्दैवाने संघटना काँग्रेसच्या सभासदानी या कपात सूचनेच्या विरोधी मत नोंदविल्याने नाथ पै यांची ही कपात सूचना नामंजूर झाली. त्यांनी बॅ. नाथ पै

यांना चेंबरमध्ये बोलावून घेऊन त्यांच्याशी या विषयावर चर्चा करून नाथ पै यांची भूमिका समजावून घेतली आणि दुसऱ्याच दिवशी २३ डिसेंबर रोजी कोकण रेल्वेचे सर्व्हेक्षण करण्याचे आश्वासन सभागृहात देण्यात आले. अशा रीतीने नाथ पै यांनी कोकण रेल्वेच्या उभारणीचा पाया घातला. त्यामुळे त्यानंतर रेल्वेमंत्री पदावर आलेल्या प्रा. मधु दंडवते आणि मा. जॉर्ज फर्नांडीस यांना कोकण रेल्वेच्या उभारणीचे कार्य समयबद्ध कालावधीत पूर्ण करता आले.

## **'दे जन्म देवा फिरुनी कोकणच्या भूमीत'**

बॅ. नाथ पै यांनी आपल्या जन्मभूमीवर- कोकणवर केलेल्या उत्कट प्रेमाची प्रचिती अनेकवेळा त्यांच्या जाहीर भाषणातूनही व्यक्त होत असे. कोकणवासीयांसमोर केलेल्या अनेक जाहीर भाषणातून नाथ पै सांगत असत,

"देव माझ्यावर प्रसन्न झाला आणि त्याने मला विचारले की, तुला पुनर्जन्म हवा असेल तर कोठे देऊ?" तर देवाला मी सांगेन मला माझ्या भारतभूमीत पुनर्जन्म दे.

देवाने मला परत विचारले की, 'भारतात तुला कोठे जन्म घेणे आवडेल?' तर मी देवाला सांगेन, भारतात मला संतांच्या महाराष्ट्राच्या भूमीत जन्म दे.

आणि देवाने मला परत विचारले की, 'महाराष्ट्रात तुला कोणत्या भागात जन्म हवा आहे?' तर मी देवाला सांगेन, महाराष्ट्रात मला माझ्या निसर्गरम्य कोकणच्या भूमीत पुनर्जन्म दे."

ज्याने कोकणावर अकृत्रिम, उत्कट, अलोट प्रेम केले आणि कोकणवासीयांनी ज्याच्यावर असेच प्रेम केले असे बॅ नाथ पै हे एकमेव नेते होते.



## सीमाप्रश्न आणि नाथ पै

राज्य पुनर्रचनेत बेळगांव, निपाणी, कारवार आदी मराठी भाषिक प्रदेश कर्नाटक राज्यात समाविष्ट करण्यात आला आणि हैद्राबादमधील मराठवाडा, मध्यप्रदेशातील विदर्भ आणि मंबई प्रांतातील मराठी भाषिक प्रदेश, गुजरात आणि कच्छ यांचे महाद्विभाषिक राज्य निर्माण करण्यात आले. १९५२च्या निवडणुकीत पराभूत झालेले माजी मुख्यमंत्री श्री. मोरारजी देसाई विशाल द्विभाषिक राज्याचे पहिले मुख्यमंत्री झाले. राज्य पुनर्रचनेच्या विरोधात मराठी भाषिक प्रदेशांत संयुक्त महाराष्ट्र समितीच्या नेतृत्वाखाली स्वतंत्र मराठी भाषिक राज्याच्या निर्मितीसाठी प्रखर आंदोलन उभारले गेले. या आंदोलनात १०५ मराठी भाषिकांचे बळी घेतले गेले. याचा परिणाम १९५७च्या निवडणुकीवर झाला. मराठी भाषिक प्रदेशात काँग्रेस पक्षाला मोठा पराभव पत्करावा लागला. पंरतु गुजरातने हात दिल्याने विशाल द्विभाषिक राज्यात काँग्रेस पक्षाचे सरकार परत सत्तेवर आले. पण मोरारजी देसाईंना मुख्यमंत्रीपद सोडावे लागले आणि महाराष्ट्रातील काँग्रेसचे नेते श्री. यशवंतराव चव्हाण विशाल द्विभाषिक राज्याचे दुसरे मुख्यमंत्री झाले. १९५७ नंतर गुजराती भाषिक प्रदेशात गुजराती भाषिकांचे स्वतंत्र महागुजरात राज्य निर्माण करावे या मागणीच्या आंदोलनाला उभारी येऊ लागली होती. ही दोन भाषिक वेगळी राज्ये केली नाहीत तर १९६२च्या निवडणुकीत विशाल द्विभाषिक राज्यात काँग्रेस पक्षाला सत्ता गमवावी लागेल याची जाणीव दिल्लीश्वरांना होऊन चुकली होती. त्यामुळे मराठी भाषिक महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीचे आणि गुजराती भाषिक गुजरात राज्याच्या निर्मितीचे विधेयक लोकसभेत १९६० साली सादर करावे लागले.

## राज्य पुनर्रचनेत मराठी भाषिकांवर अन्याय

या वियकाने जी मुंबई आकाशात सूर्य-चंद्र असेतोवर म्हणजे कधीच महराष्ट्राला मिळणार नाही अशा वल्गना काँग्रेस पक्षातील काही ज्येष्ठ मंडळी करीत होती, ती मुंबई महाराष्ट्राला मिळाली. पण गुजरातच्या सीमेवरील

डांग-उंबरगांव गुजरात राज्यात समाविष्ट करण्यात आले होते, कारण काय तर 'डांग-उंबरगावच्या' निवडणुका गुजरातवाद्यांनी जिंकल्या होत्या, पण हाच न्याय महाराष्ट्र आणि कर्नाटकाच्या सीमेवरील बेळगांव, निपाणी, कारवार आदी मराठी भाषिक प्रदेशाला नाकारण्यात आला होता. या भागातील ग्रामपंचायतीपासून विधानसभेपर्यंतच्या सर्व निवडणुका महाराष्ट्र एकीकरण समितीने जिंकल्या होत्या. वास्तविक डांग-उंबरगाव ज्या न्यायाने गुजरात राज्यात समाविष्ट करण्यात आले त्याच न्यायाने कर्नाटकाच्या सीमेवरील बेळगांव, निपाणी, कारवार आदी मराठी भाषिक प्रदेश महाराष्ट्र राज्यात समाविष्ट करण्यासाठी काँग्रेसच्या नेत्यांनी त्यावेळी या प्रकरणी कचखाऊ भूमिका का स्वीकारली, हे अनाकलनीय आहे. त्यावेळी या मंडळींनी बेळगांव, निपाणी, कारवारशिवाय महाराष्ट्र राज्याचा प्रस्ताव स्वीकारायला नको होता, तो प्रदेश महाराष्ट्र राज्यात समावून घेण्याची तीच वेळ होती. आंध्र आणि कर्नाटक राज्यांच्या सीमांचा प्रश्न श्री. हरीभाऊ पाटसकर निवाड्यानुसार खेडे हा घटक, भाषिक मताधिक्य, भौगोलिक सलगता आणि लोकेच्छा या तत्त्वावर सोडविला गेला तोच न्याय कर्नाटक राज्यातील बहुसंख्य मराठी भाषिक असलेला प्रदेश (सीमाभाग) महाराष्ट्र राज्यात समाविष्ट करण्यासाठी महाराष्ट्रातील काँग्रेस पक्षाच्या नेत्यांनी आग्रह धरायला हवा होता. पण मिळाले ते पदरात घेऊया आणि उरलेल्यांसाठी आग्रह धरून प्रयत्न करुया अशी व्यावहारिक भूमिका स्वीकारून महाराष्ट्रातील काँग्रेसजनांनी बेळगांव, निपाणी, कारवार आदी भागातील मराठी भाषिकांवर मोठाच अन्याय केला आहे. पण या सीमाभागातील मराठी भाषिक हा अन्याय सहन करायला कदापि तयार झाले नसते, महाराष्ट्र एकीकरण समितीच्या नेतृत्वाखाली हा प्रदेश महाराष्ट्र राज्यात समाविष्ट करण्यासाठी आजही त्यांचा लढा चालला आहे.

बॅ. नाथ पै यांचा जन्म जरी वेंगुर्ल्यात झाला असला तरी त्यांचे माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण बेळगावात झाले होते, तरुणपणात कार्यक्षेत्रही बेळगाव राहिले होते. या पार्श्वभूमीवर 'सीमाप्रश्न' त्यांच्या जिव्हाळ्याचा असणे स्वाभाविकच होते. पण त्याहीपेक्षा बॅ. नाथ यांची लोकशाहीवर श्रद्धा होती. 'सीमाप्रश्न' हा खर्‍या अर्थाने व्यापक नोकरशाहीचा प्रश्न आहे अशी त्यांची धारणा होती आणि लोकराज्यात लोकांच्या इच्छा-आकांक्षांना न्याय मिळाला

पाहिजे अशी त्यांची अपेक्षा होती. भारतीय लोकशाहीच्या लढ्यातील सीमाप्रश्न हा एक भाग आहे असे त्यांनी मानले आणि त्या पद्धतीनेच त्यांनी तो हाताळला. त्यांच्या मनाला कानडी द्वेष कधी शिवला नाही. कानडी भाषेबद्दल त्यांच्या मनात सदैव प्रेम आणि कन्नडवासीयांबद्दल आदराची भावना वसलेली असे पण सामाजिक बांधिलकीची जाण ठेऊन कर्तव्य भावनेने सीमाभागातील मराठी भाषिकांना न्याय मिळवून देण्यासाठी महाराष्ट्र एकीकरण समितीच्या कार्यात बॅ. नाथ पै यांचा सदैव सक्रिय सहभाग राहिला होता.

## कर्नाटकातील कारागृहात महाराष्ट्राचे स्वागत

१९६० साली महाराष्ट्र एकीकरण समितीने सीमाभागात सारावंदीचा लढा सुरू केला होता. कर्नाटक पोलिसांनी सारा वसुलीसाठी जबरदस्तीने जप्तीचे सत्र सुरू केले होते. खानापूर तालुक्यातील 'इदलहोंड' या गावी कर्नाटक पोलिसांनी सारा वसुलीसाठी चालविलेल्या जुलूम जबरदस्तीला खारदार बॅ. नाथ पै, महाराष्ट्र एकीकरण समितीचे चिटणीस ॲड. बळवंतराव सायनाक आणि ॲड. राम आपटे यांनी विरोध केला. त्यावेळी सरकारी कामात अडथळा केल्याच्या आरोपाखाली तिघांनाही अटक करून पोलिसांनी खटला भरला. या खटल्यात तिघानांही साडेचार महिन्यांची तुरुंगवासाची सजा झाली. बॅ. नाथ पै खासदार असल्याने तुरुंगात त्यांना 'अ' वर्गीय कैद्यांना दिल्या जाणाऱ्या सवलती देणे आवश्यक होते. पण तुरुंगाधिकाऱ्यांनी तेवढेही सौजन्य दाखविले नाही. वर्तमानपत्रांनी याविरुद्ध ओरड केल्यावर बॅ. नाथ पै 'अ' वर्गाच्या सवलती देऊ केल्या. त्यावेळी नाथ पै यांनी तुरुंगाधिकाऱ्यांना सांगितले, "तुरुंगात माझ्यासमवेत माझे दोन सहकारी आहेत, त्यांना सोडून मी एकटा या सवलती स्वीकारू शकत नाही."

१ मे १९६० साली महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. त्यावेळी सीमाभागातील मराठी भाषिकांना न्याय मिळवून देण्यासाठी लढणारा महाराष्ट्राचा हा खासदार कर्नाटकातील तुरुंगात तुरुंगवासाची सजा भोगत होता. नाथने तुरुंगाच्या गजाआडून महाराष्ट्र राज्याचे स्वागत केले. उगवत्या महाराष्ट्र राज्याला मराठी भाषिक प्रदेशाच्या एकीकरणासाठी लढणाऱ्या

महाराष्ट्राच्या या खासदाराने तुरुंगातून अभिवादन केले. ३ जून १९६० रोजी बॅ. नाथ पै, ॲड. बळवंत सायनाक आणि ॲड. राम आपटे यांची तुरुंगातून सुटका झाली. तुरुंगात नाथ पैंचे वजन १४ पौंडानी घटले होते. तुरुंगातून सुटल्यावर त्यांची बेळगांवात युनियन जिमखाना मैदानावर जाहीर सभा झाली. त्या सभेत नाथ पै यांनी सीमेच्या लढ्याचे स्वरूप स्पष्ट करून हा लढा पुढे उद्दीष्ट साध्य होई पर्यंत चालविण्यासाठी सर्वांना सहकार्य करायचे आवाहन केले.

खेडे हा घटक, भाषिक बहुमत, भौगोलिक सलगता आणि लोकेच्छा ही सूत्रे स्वीकारून सीमाप्रश्न सोडवावा, याचा पाठपुरावा बॅ. नाथ पै यांनी लोकसभेत विविध संसदीय आयुधे वापरून सातत्याने केला. महाराष्ट्र एकीकरण समितीच्या कार्यात आणि आंदोलनात वेळोवेळी सातत्याने भाग घेतला. सीमाप्रश्न लवकर सुटावा म्हणून महाराष्ट्र एकीकरण समितीने १९६५ साली मुंबईत निदर्शने केली. त्या निर्दशनात भगवा फेटा बांधून नाथ पैही सहभागी झाले होते. निदर्शकांस पांगविण्यासाठी पोलिसांनी लाठीमार केला त्यात नाथ पै यांच्या पायांना दुखापत झाली होती.

## महाराष्ट्र एकीकरण समितीच्या नेत्यांचे उपोषण

महाराष्ट्र एकीकरण समितीच्या नेत्यांनी अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या मुंबईत होणाऱ्या सभेच्या वेळी उपोषणास बसण्याचा निर्णय घेतला होता. सीमाभागातील महाराष्ट्र एकीकरण समितीच्या सातही आमदारांनी विधानसभा सभादत्वाचे राजीनामे देऊ केले होते. त्यावेळी पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी त्यांना सबुरीचा सल्ला दिला आणि महाराष्ट्र एकीकरण समितीच्या नेत्यांना दिल्लीला भेटीस बोलावले. बॅ. नाथ पै यांच्या नेतृत्वाखाली १६ मे १९६५ रोजी महाराष्ट्र एकीकरणाच्या शिष्टमंडळाने पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांची भेट घेतली, खासदार नाथ पै यांनी सीमावासीयांची कैफियत प्रभावीपणे पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधींसमोर मांडली. श्रीमती इंदिरा गांधी यांनी सहानुभूतीने प्रश्न सोडविण्याचे आश्वासन गिले. दिल्लीच्या भेटीत नाथ पै यांच्यासमवेत शिष्टमंडळाने गृहमंत्री आणि काँग्रेसच्या अन्य ज्येष्ठ

नेत्यांचीही भेट घेतली. सर्वांची सहानुभूती दिसून आली. पण ताबडतोबीने काही निष्पन्न होण्याची शक्यता दिसून आली नाही. या पार्श्वभूमीवर अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या मुंबईच्या सभेच्या वेळी उपोषणाचा कार्यक्रम करण्याचे निश्चित झाले.

२० मे १९६६ रोजी उपोषणाला बसण्यापूर्वी महाराष्ट्र एकीकरण समितीचे नेते श्री. बा. रं. सुंठणकर, ॲड. बळवंतराव सायनाक आणि दे. भ. पुंडलिकजी कातगडे सेनापती बापट यांचा आशीर्वाद घेण्यासाठी गेले असता सेनापती यांनीही त्यांच्याबरोबर उपोषणास बसण्याचा आपला निर्धार जाहीर केला. उपोषणास बसण्यापूर्वी ही मंडळी महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री नामदार वसंतराव नाईक यांना भेटण्यासाठी त्यांच्या बंगल्यावर गेली. नामदार वसंतराव नाईक घरी नव्हते. सुरक्षा दलाच्या रक्षकांनी त्यांना बंगल्यात प्रवेश करण्यापूर्वी वाटेत रस्त्यावरच अडविले. तेव्हा त्यांनी रस्त्यावरच बैठक मारून उपोषण सुरू केले. थोड्या वेळात मुख्यमंत्री नामदार वसंतराव नाईक आले आणि उपोषणाला बसलेल्या नेत्यांना भेचून बंगल्यात घेऊन गेले. हे उपोषण मागे घेण्यासाठी नामदार वसंतराव नाईक यांची शिष्टाई काही सफल झाली नाही आणि उपोषण सुरूच राहिले.

दिनांक २२ मे १९६६ रोजी रात्रौ ८.३० वाजता पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी सेनापती बापट आणि महाराष्ट्र एकीकरण समितीचे नेते उपोषणास ज्या ठिकाणी बसले होते त्या ठिकाणी जाऊन भेट घेतली. त्यांनी उपोषणास बसलेल्या नेत्यांना या प्रश्नांसठी कमिशन नेमण्याचे आश्वासन दिले. त्यावर सत्याग्रहींनी कमिशनला स्पष्ट मार्गदर्शक तत्त्वे घालण्याविषयी सूचना केली असता इंदिरा गांधीनी त्याबाबतीत काही अडचणी असल्याचे सांगितले. त्यावर सत्याग्रहींनी इतरांशी चर्चा करून आपला निर्णय कळवतो असे श्रीमती इंदिरा गांधीना सांगितले.

श्रीमती इंदिरा गांधी निघून गेल्यावर संरक्षण मंत्री नामदार यशवंतराव चव्हाण यांना घेऊन मुख्यमंत्री वसंतराव नाईक पुन्हा उपोषणासा बसलेल्या नेत्यांना घेऊन आले. खूप विचारांती उपोषण करणाऱ्यांची पुढीलप्रमाणे श्रीमती इंदिरा गांधींना पत्र पाठविण्याबाबत एकवाक्यता झाली.

“आम्ही उपोषण सुरू केल्यापासून ज्या उद्दीष्टासाठी आम्ही हे उपोषण सुरू केले त्याच्या दिशेने प्रगती होण्यासारखे असे अद्यापि काही घडलेले नाही की, त्यासाठी आम्ही उपोषण सोडावे.”

बॅ. नाथ पै यांनी हे पत्र श्रीमती इंदिरा गांधींना पोहोचते करावे असा सत्याग्रहींनी आग्रह धरला. त्यानुसार बॅ. नाथ पै यांनी ते पत्र इंदिरा गांधीना पोहोच केले.

इंदिरा गांधींनी दिनांक २३ मे रोजी सदर पत्राला पाठविलेल्या उत्तरानेउपोषण करणाऱ्या सत्याग्रहींना कळविले की, “आंतरराज्यीय सीमावाद न्याय्य आणि शांततेच्या मार्गाने आम्हास सोडवायचा आहे आणि त्यासाठी योग्य अशी यंत्रणा उभी करण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी आज रात्रौ काँग्रेस वर्किंग कमिटीची सभा भरत आहे.”

श्रीमती इंदिरा गांधीच्या वरील पत्रावर काँग्रेस वर्किंग कमिटीता ठराव पाहून उपोषणाबाबत निर्णय घेण्याचे उपोषणास बसलेल्या नेत्यांनी ठरविले.

दिनांक २३ मे १९६६ रोजी रात्रौ १२.३० वाजता श्री. यशवंतराव चव्हाण आणि मुख्यमंत्री वसंतराव नाई उपोषणास बसलेल्या नेत्यांना भटेवयास आले. सेनापतींना उठविण्यात आले. नामदार यशवंतराव चव्हाण सेनापतींना म्हणाले, “एक सदस्य यंत्रणा उभी करण्याचा निर्णय काँग्रेस वर्किंग कमिटीने घेतला आहे. खूप मिळाले आहे. उपोषण सोडा.”

पण काँग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावाने उपोषणास बसलेल्या नेत्यांचे समाधन झाले नाही. ठरावात कालावधी नव्हता. लोकेच्छेबद्दल काही नव्हते. त्यामुळे नामदार यशवंतराव चव्हाण यांची विनंती उपोषण करणाऱ्या नेत्यांनी मान्य केली नाही.

## सेनापतींचे प्राण मोलाचे मानणारे नाथ

बॅ. नाथ पै यांनी उपोषणास बसलेल्या नेत्यांशी चर्चा करून काँग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावात कालमर्यादा व निकष यांचा अभाव असल्याने उपोषणास बसलेल्या नेत्यांचे उपोषण सुरू राहणार असल्याचे जाहीर केले.

दिनांक २४ मे १९६६ रोजी सेनापती बापट यांची प्रकृती खूपच बिघडली होती. सेनापती बापट यांना पंतप्रधान इंदिरा गांधींना याबाबत अखेरचे पत्र लिहावे असे ठरले. हे पत्र नाथ पै यांनी इंदिरा गांधींना द्यावे असे ठरले. इंदिरा गांधी वर्किंग कमिटीची बैठक संपताच पुण्याला रवाना झाल्या होत्या. २४ मे १९६६ रोजी त्यांचा मुक्काम पुण्याला होता. फोनाफोनी झाली. रात्री नाथ पै यांना पुण्याला पाठवा असा त्यांचा निरोप आला. पुण्याला २५ तारखेला पंतप्रधानांची विरोधी पक्षाच्या नेत्याशी बैठक होती व प्रेस कॉन्फरन्सही होती. त्यावेळी बॅ. नाथ पै यांची उपस्थिती तेथे अनिवार्य होती.

नाथला बोलवायला प्रा. अनु वर्गे नाथच्या निवासस्थानी गेले. नाथ पै यांना त्या दिवशी बरे वाटत नव्हते. रात्रौ पुण्याला जायचे म्हटल्यावर नाथच्या पत्नी सौ. क्रिस्टल खूप संतापल्या. 'तुम्ही काय नाथला मारायचे ठरविले आहे काय?' असे संतापाने बोलून गेल्या. पण नाथला स्वतःच्या जीवापेक्षा सेनापती बापटांचे प्राण वाचविणे अधिक मोलाचे वाटले. क्रिस्टलच्या विरोधाला न जुमानता नाथ पुण्याला जावयास निघाले.

सेनापती बापट यांनी पंतप्रधान इंदिरा गांधींना लिहिलेल्या अखेरच्या पत्रात नमूद केले होते की, "सीमा भागातील जनता नेहमी आवर्जून सांगत आली आहे की, लोकशाही मार्गाने व्यक्त झालेली लोकेच्छा लक्षात घेऊनच हा प्रश्न सोडवावा. ही मागणी योग्य आणि न्याय आहे असे माझे मत आहे. ही मागणी आपण मान्य करावी अशी कळकळीची विनंती मी करू इच्छितो."

श्री. सेनापती बापटांचे पत्र नाथनी इंदिराजींना दिले. त्यावेळी मुख्यमंत्री वसंतराव नाईकही तेथे उपस्थित होते. एक महिन्यात एक सदस्य कमिशनची नेमणूक करण्यात येईल आणि विवाद्य भागातील लोकेच्छा हे मूलभूत मार्गदर्शक तत्त्व राहिल, असे निःसंदिग्ध अभिवचन व स्पष्टीकरण इंदिराजींनी केले आणि पत्रकार परिषदेतही श्री. नाईक यांनी ते स्पष्टपणे सांगितले. विरोधी पक्षनेत्यांशी झालेल्या बैठकीतही श्रीमती इंदिरा गांधींनी "मी हे अभिवचन पूर्वी दिले आहे, आताही दिले आहे आणि त्याचाच मी पुनरुच्चार करीत आहे!" असे सांगितले.

नाथ पै २५ मे रोजी सायंकाळी मुंबईत आले आणि उपोषणास बसलेल्या नेत्यांनी आणि महाराष्ट्र एकीकरण समितीच्या इतर नेत्यांना सर्व हकीगत

सांगितली. त्यानंतर महाराष्ट्र एकीकरण समितीच्या नेत्यांनी उपोषण सोडण्याचा निर्णय जाहीर केला.

श्रीमती इंदिरा गांधींनी आश्वासन दिल्याप्रमाणे एक महिन्याच्या कालावधीत सीमा प्रश्नासाठी एक सदस्य महाजन कमिशनची नियुक्ती केली.

## नाथ पै यांचे राज्य सीमा मंडळ विधेयक

पण महाजन कमिशनला कुठलीही मार्गदर्शक तत्त्वे दिली नसल्याने महाजन कमिशनचा अहवाल महाराष्ट्राच्या विरोधात गेला आणि सीमा समस्या अधिक जटील बनली. त्यानंतर झालेल्या लोकसभेच्या निवडणुका, काँग्रेस पक्षाचे झालेले विभाजन, बांगला देशाची लढाई आणि १९७१च्या जानेवारीत लोकसभा बरखास्त करून इंदिरा गांधींनी घेतलेली लोकसभेची मध्यावधी निवडणूक अशा धकाधकीच्या राजकीय वातारवरणात सीमा प्रश्न रेंगाळत राहिला. पण बॅ. नाथ पै यांनी मात्र सीमा प्रश्नाचा पाठपुरावा सोडला नाही. नाथ पै यांची लोकशाहीवर श्रद्धा होती. लोकशाहीत लोकसभा सार्वभौम असते. राज्यांच्या सीमांसारख्या वादग्रस्त समस्या कटूता टाळून शांततेच्या व सनदशीर मार्गांनी मार्गदर्शक तत्त्वांच्या आधारे कायदे करून सोडविले पाहिजेत, असे त्यांचे मत होते. या संदर्भात नाथ पै यांनी १९६९ साली एक अशासकीय विधेयक लोकसभेत सादर केले होते. या विधेयकामागील उद्देश नाथ पै यांनी पुढील शब्दात व्यक्त केला होता.

“राज्य पुनर्रचना झाल्यावरही सीमा अनिर्णित राहिल्यामुळे राज्याराज्यात सीमाप्रश्नावरुन तंटे वाढत आहेत. त्यातून निर्माण होणाऱ्या कटुतेमुळे राष्ट्राच्या ऐक्याला धोका निर्माण झाला आहे. राष्ट्राचे ऐक्य टिकविण्यासाठी, त्याचप्रमाणे जनतेचा लोकशाहीवरील विश्वास दृढ करण्यासाठी असे सर्व तंटे तातडीने मिटविले पाहिजेत. निश्चित आणि सर्वमान्य तत्त्वांच्या अभावी असे तंटे अजूनपर्यंत मिटू शकले नाहीत. या विधेयकाद्वारे अशी मार्गदर्शक तत्त्वे मांडण्यात येत आहेत.”

नाथ पै यांचे महत्त्वपूर्ण विधेयक पुढीलप्रमाणे होते.

भारतीय प्रजासत्ताकाच्या वीसाव्या वर्षी संसद पुढील कायदा करीत आहे.

१) (अ) “राज्य सीमा मंडळ कायदा, १९६९” या नावाने हा कायदा ओळखला जावा.”

(ब) हा कायदा ताबतोब अंमलात येईल.

२) राष्ट्रपती राज्य सीमा मंडळाची नियुक्ती करतील. या मंडळाचे अध्यक्ष वरीष्ट न्यायालयाचे न्यायाधीश राहतील. शिवाय मंडळाचे आणखी दोन सदस्य असतील. मात्र ते केंद्र वा राज्य सरकारचे नोकर असता कामा नयेत.

३) खाली नमूद केलेल्या कसोट्यांच्या अधीन राहून मंडळ प्रत्येक सीमा तंटा सोडवील/मिटवील.

(अ) खेडे हा घटक मानण्यात यावा.

(ब) भाषिक बहुमत आणि ते नसल्यास साक्षेप बहुमत निर्णायक मानण्यात यावे.

(क) वरील दोन कसोट्या लागू करताना प्रदेशांची भौगोलिक सलगता विचारात घेण्यात यावी.

सीमाप्रश्नांच्या बाबतीत बॅ. नाथ पै यांनी सुचविलेल्या या मार्गाचा अवलंब केला असता तर उभय पक्षातील कटूता टाळून हा प्रश्न यापूर्वीच सामोपचाराने सोडविता आला असता, पण हितसंबंधियांच्या दबाबाखाली अगर अन्य अनाकलनीय कारणाने भारत सरकारची हा प्रश्न सोडविण्याची मानसिकता दिसून येत नाही, हे सीमा भागातील मराठी भाषिकांचे आणि महाराष्ट्राचेही दुर्दैव म्हणायला हवे.

## बॅ नाथ पै यांचे अखेरचे भाषण

महाराष्ट्र एकीकरण समितीच्यावतीने सीमाभागात १७ जानेवारी हा दिवस दरवर्षी हुतात्मा दिन म्हणून पाळला जातो. मराठी भाषिकांच्या महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीसाठी बलिदान केलेल्या हुतात्म्यांना त्यादिवशी अभिवादन

करून संपूर्ण मराठी भाषिक राज्याच्या निर्मितीचा निर्धार या दिवशी केला जातो. १७ जून १९७१ रोजी महाराष्ट्र एकीकरण समितीने आयोजित केलेल्या हुतात्मा दिनाच्या जाहीर सभेला उपस्थित राहण्याचे नाथ पै यांनी मान्य केले होते.

१० वर्षानंतर नाथ पै बेळगावच्या जाहीर सभेत भाषण करणार होते. त्यामुळे सभेला प्रचंड गर्दी जमली होती. नाथची प्रकृती त्यादिवशी खूपच खालावलेली होती. डॉक्टरांनी त्यांना पूर्ण विश्रांती घेण्याचा सल्ला दिला होता. इतकेच नव्हे तर भाषण करण्यासही सक्त मनाई केली होती. पण हट्टी नाथने छातीत दुखत असताना छातीतली कळ दाबून डॉक्टरांचा सल्ला न जुमानता त्यादिवशी हुतात्मादिनाच्या सभे ५५ मिनिटे भाषण केले.

आपल्या भाषणाच्या सुरुवातीलाच नाथ पै म्हणाले, "मी आज तुमच्याशी मन मोकळेपणाने बोलणार आहे. भावनात्मक दृष्ट्या सीमाप्रश्नांशी मी जेवढा निश्चित निगडित आहे, तेवढा दुसऱ्या कोणत्याही प्रश्नांशी नाही. बेळगावच्या मातीतच मी वाढलो. येथील जनतेने मला पोसले, वाढवले आणि मोठे केले आहे. अनेक वर्षानंतर मी आपल्याशी बोलत आहे, आपण सीमाप्रश्नांकरता जो लढा दिला त्याला महाराष्ट्राच्या इतिहासात तोड नाही. महाराष्ट्रासाठी आणि मराठी भाषिकांसाठी तुम्ही फार मोठे कार्य केले आहे. यापुढील काळ तुमच्या कसोटीचा आहे. तुम्ही साऱ्यांनी आपापसातील मतभेद विसरून एकदिलाने काम केले पाहिजे. आपल्यामधील ऐक्य, निश्चय, उमेद आणि तोल अखेरपर्यंत टिकून राहिले पाहिजेत.

सीमा प्रश्नासाठी सेनापती बापट यांनी केलेल्या उपोषणाचा उल्लेख करून नाथ पै म्हणाले, "सीमेच्या प्रश्नांवर सेनापती बापट यांचे उपोषण चालू होते आणि त्यांची प्रकृती गंभीर बनत चालली होती. शेवटी त्यांना रक्तस्त्राव होऊ लागला आणि त्यांनी मला बोलावणे पाठविले. मी गेलो. सेनापतींच्या चरणांना स्पर्श करून वंदन केले. जवळच असलेल्या सहकाऱ्याकडून सेनापतींनी हार आणून घेतला आणि माझ्या गळ्यात हार घालून आशीर्वाद देऊन ते म्हणाले, 'देश सेवेसाठी तुम्हाला उदंड आयुष्य लाभो!' माझ्या आयुष्यातील सर्वोत्कृष्ट सुंदर असा क्षण असेल तर तो हाच. मी ह्या सन्मानापुढे भारतरत्नसारखी पदवी कःपदार्थ मानतो."

महाजन आयोगाविषयी उल्लेख करून या भाषणात नाथ पै पुढे म्हणाले, “महाजन आयोगाला माझा विरोधच आहे. याबाबत काही लोकांनी मला दूषणे दिली आणि सांगितले, ‘नाथ, तू तरुण आहेस तुझ्या हट्टापायी अनेकांचे प्राण धोक्यात येण्यासारखे आहेत, तू हट्ट सोडून दे. सध्या जे प्राप्त होण्यासारथे आहे त्याचा स्वीकार करूया.’ पण माझा विरोध होता तो बिनबुडाच्या महाजन आयोगाच्या स्थापनेला, कोणतीच कालमर्यादा न ठेवता, प्रश्न सोडविण्यासाठी कोणतीच तत्त्वे निश्चित न करता, आयोग, कमिट्या, मंडळे नेमण्याला माझा विरोध होता, आजही आहे. अशी बिनआधाराची मंडळे म्हणजे जनतेची फसवणूक करणारे, जनतेला अडकवून ठेवमारे सोनेरी पिंजरेच आहेत.”

लोकसभा आपल्याकडे वळवून घ्यावी म्हणून कर्नाटकच्या प्रतिनिधींनी खूप प्रयत्न केले. सुंदर नक्षीदार अशा चंदनी चकत्या वाटण्यात आल्या. त्याचा उल्लेख करून नाथ पै म्हणाले, “खुशबूचे वातावरण आहे, सुवासिक चंदनी चकत्यांचा वास घेता घेता महाजन अहवालाची दुर्गंधी दूर करुया.”

महाजन अहवाल लोकसभेपुढे आला त्यावेळी दुपारचा १ वाजला होता. १ वाजून ५ मिनिटांनी अहवालासंबंधी पाठविलेले दोन ठराव चर्चेसाठी घेण्याचे सभापतींनी घोषित केले. म्हैसूरच्या सदस्यांनी आकांडतांडव केले, त्यांनी सरकार आणि नाथ पै यांचे मेटकूट जमले आहे, असाही आरोप केला. त्याला उत्तर देताना नाथ पै म्हणले, “मित्रांनो, तुम्हाला लोकसभेचे कामकाज माहीत असते तर तुम्हालाही अशा प्रकारचे ठराव पाठविता आले असते. लोकसभेत मुहूर्त साधावा लागतो, त्यासाठी लोकप्रतिनिधींना सतत जागृत राहावे लागते, शरसंधान करावे लागते. खेडे, भाषिक सलगता आणि लोकेच्छा या तत्त्वांच्या आधारावर सीमा प्रश्न सोडवला जावा असे या लोकसभेला वाटते, अशा स्वरूपाची सूचना मी लोकसभेपुढे मांडली. संघटना काँग्रेसखेरीज अन्य सार्‍या पक्षांनीच माझ्या सूचनेला अनुमती दर्शविली.”

बेळगावच्या फाळणीसंबंधी उल्लेख करून नाथ पै या भाषणात म्हणाले, “देशाची फाळणी करून सत्ता मिळविणार्‍यांनी बेळगावच्या फाळणीचा बेत आखला होता. त्याला मी कसून विरोध केला. अखेर बेळगावच्या फाळणीचा डाव उधळून लावण्यात आम्ही यशस्वी झालो. पार्लमेंटरी कमिटीचा बुट निघाला. त्यालाही मी विरोध केला. कारण नव्या सापळ्यात सीमा भागातील

जनता अडकू नये असे मला वाटते. सीमाप्रश्नाच्या बाबतीत पार्लमेंटचे मत मी महाराष्ट्राच्या बाजूला वळवू शकेन असा मला विश्वास वाटतो. कारण सीमेचा प्रश्न हा न्यायाचा आहे, नीतीचा आहे, धर्माचा आहे, न्याय-नीतीचाच विजय होतो. तुम्हा सर्वांच्या आशीर्वादाने मी विजयी होईन, अशी मला उमेद आहे.”

भाषण करून व्यासपीठावरून खाली आल्यावर नाथ पै म्हणाले, “आज मी सीमावासीयांच्या ऋणातून मुक्त झालो!”

दुर्दैवाने बॅ. नाथ पै यांचे चे अखेरचे भाषण ठरले.



## स्वभाव दर्शन आणि गुण विशेष

बॅ. नाथ पै यांच्या जीवनातील लहानमोठ्या प्रसंगातून, त्यांच्या बोलण्यातून आणि त्यांनी सहकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रातून त्यांचे स्वभाव दर्शन आणि गुण दर्शन घडले आहे. नाथ पैंना आपल्या मृत्यूचीही चाहूल लागली होती व त्याबाबतचे विचार त्यांनी आपल्या सहकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रातूनही व्यक्त केले होते. त्यांच्या जीवनातील अशा काही प्रसंगाचे आणि पत्राद्वारे व्यक्त झालेल्या विचारांचे संकलन या प्रकरणात केले आहे.

## कृतीने शिकवण देणारे नाथ पै

आंतरराष्ट्रीय कीर्तीचे साम्यवादी नेते कॉ. एम्. एन्. राय यांनी भारतात आल्यावर रॅडिकल डेमोक्रॅटीक पार्टी स्थापन केली होती. दुसऱ्या महायुद्धात देशोदेशींच्या साम्यवादी पक्षांनी हिटलरविरोधी भूमिका घेऊन ब्रिटिशांना मदत केली होती. रॅडिकल डेमोक्रॅटीक पार्टीही याला अपवाद नव्हती. बेळगावांत बा. र. सुंठणकर आणि स. र. सुंठणकर बंधू या पक्षाचे काम करीत. तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशीही या पक्षाचे पुरस्कर्ते होते. ते विचरावंत व उत्कृष्ट वक्ते अशी त्यांची ख्याती होती. ते बेळगांवला आले असता मारुतीच्या मंदिरात रात्रौ त्यांची सभा ठेवण्यात आली होती. या पक्षाच्या मंडळीनी युद्धकाळात ब्रिटिशांना मदत केली म्हणून राष्ट्र सेवा दलाच्या तरुण कार्यकर्त्यांचा त्यांच्यावर राग होता. त्या दिवशी नाथ पै यांचे सहकारी राष्ट्र सेवा दलाचे कार्यकर्ते श्री. वासू देशपांडे आपल्या काही सहकाऱ्यांसह सभा उधळण्यासाटी सभेला उपस्थित राहिले होते.

तर्कतीर्थ भाषण करायला उभे राहताच वासू देशपांडे ओरडले, “तर्कतीर्थ खाली बसा. तुम्ही इंग्रजांचे एजंट आहात.” वासू देशपांडेच्या सहकाऱ्यांनी त्यांना साथ दिली.

“नाही, आम्ही इंग्रजांचे एजंट कधीच नव्हतो.” तर्कतीर्थ उत्तरले.

“होतात. युद्धात तुम्ही इंग्रजांना मदत केली व त्यासाठी तुम्ही पैसे घेतलेत.” इति वासू देशपांडे.

"होय घेतले. पण युद्ध लोकशाही विरुद्ध हुकुमशाही यात झाले म्हणून आम्ही लोकशाहीच्या बाजूने दोस्तराष्ट्रांच्या बाजूने प्रचार केला." तर्कतीर्थ जोशी.

"म्हणून काय झाले; काँग्रेसने त्यावेळी स्वातंत्र्याचा लढा सुरू केला होता." इति. वासू देशपांडे.

या जुगलबंदीत वातावरण तापले. तर्कतीर्थ आदींच्या विरुद्ध घोषणा सुरू झाल्या. तेवढ्यात वक्त्यांसमोरच्या टेबलावर चढून वासू देशपांडे उभे राहिले आणि म्हणाले, "लोकहो, उभे रहा! आपण आता राष्ट्रगीत म्हणूया."

लोक उभे राहिले आणि राष्ट्रगीत म्हणू लागले. राष्ट्रगीत होताच वासू देशपांडे यांनी सभा संपल्याचे जाहीर केले आणि टेबलावरील गॅसची बत्ती विझवून टाकली.

अशा प्रकारे सभा उधळली गेली. नाथ पै यांच्या सहकाऱ्यांनी सभा उधळली असा गावात गवगवा झाला.

दुसऱ्या दिवसी रात्रौ बेळगावजवळ शहापूरला तर्कतीर्थांचे भाषण होते. त्या व्याख्यानाला नाथ पै आपल्या वासू देशपांडे आदी ज्यांनी आदल्या दिवशी तर्कतीर्थांच्या सभेत गोंधळ घातला होता त्यांना घेऊन सभेला उपस्थित झाले.

नाथला पाहून तर्कतीर्थ म्हणाले, "नाथ पै आले आहेत."

नाथने खुलासा केला, "आम्ही सभा उधळायला नाही आलो आहोत, तुमचे भाषण ऐकायला आलो आहोत."

तर्कतीर्थांची शहापूरची सभा व्यवस्थित पार पडली. नाथने आपल्या सहकाऱ्यांना दोष दिला नाही. लोकशाहीत इतरांचे म्हणणे ऐकून घेतले पाहिजे, हे आपल्या सहकाऱ्यांना प्रत्यक्ष कृतीने शिकविले.

## परकीय सरकारचे पारितोषिक नको

नाथचे सहकारी श्री. वासू देशपांडे यांनी बेळगांव शहरात भरवस्तीत चालणारा दारूचा गुत्ता पकडून दिला होता. त्याबद्दल त्यावेळच्या इंग्रज सरकारकडून वासू देशपांडे याला कप व रोख बक्षीस जाहीर करण्यात आले होते. पोलिसांनी देशपांडे यांना पोलिस स्टेशनवर येऊन बक्षीस घेऊन जाण्यास सांगितले होते. वासू देशपांडे यांनी ही गोष्ट पैंना सांगितली आणि सल्ला विचारला. नाथ म्हणाले, "वासू, देश पारतंत्र्यात आहे. आपण इंग्रजी सत्तेविरुद्ध लढतो आहोत. त्याचं बक्षीस स्वीकारणे मला उचित वाटत नाही. परक्याचे बक्षीस नको. गौरव वगैरे स्वराज्यात आपल्या सरकारकडून स्वीकारायचे."

श्री. वासू देशपांडे यांनी पोलिस चौकीवर जाऊन लिहून दिले. 'इंग्रज सरकारने दिलेले बक्षीस नको म्हणून नाकारत आहे.'

## गटबाजीच्या राजकारणाला थारा नाही

बेचाळीसच्या आंदोलनात नाथ पै तुरुंगातून सुटल्यावर त्यांना कर्नाटक प्रांतिक काँग्रेस कमिटीवर घेण्यात आले होते. कर्नाटकच्या राजकारणात दे. भ. गंगाधरराव देशपांडे यांना अनन्यसाधारण स्थान होते. त्यांच्या शब्दाला सर्वत्र मान होता. लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी दोघांचेही सहकारी म्हणून त्यांनी कार्य केले होते. त्यांचे प्रस्थ कमी करावे असा जिल्हा काँग्रेस कमिटीच्या नेत्यांचा प्रयत्न होता. एक दिवस जिल्हा काँग्रेसचे नेत नाथ पैंना भेटायला आले. ही पूर्व नियोजित भेट होती. जिल्हा काँग्रेसच्या नेत्यांनी आपला मनसुबा स्पष्ट केला.

नाथ पै यांनी गंगाधरराव देशपांडे यांच्या विरोधात त्यांना मदत करायची होती. त्याच्या बदल्यात नाथ पै यांना ए.आय.सी.सी.वर पाठविण्याची त्यांची तयारी होती. ए.आय.सी.सी.चे सभासद असणे ही मोठी बहुमानाची गोष्ट होती.

नाथ पै यांनी स्पष्टपणे पण विनम्रपणे त्यांची सूचना धुडकावून लावली आणि त्यांना स्पष्टपणे सांगितले, "काही प्रश्नावर आमचे व गंगाधररावांचे जरूर मतभेत आहेत. पण गटबाजीच्या राजकारणात आम्हाला मुळीच रस नाही. गंगाधरराव आम्हाला वंद्य आहेत. ते अव्वल दर्जाचे देशभक्त आहेत."

नाथ पै यांनी आपल्या जीवनात अशा गटबाजीच्या राजकारणाला कधीच थारा दिला नाही.

## नाथचा प्रामाणिकपणा आणि प्रांजळपणा

नाथ पै यांनी १९५२ साली बेळगांव शहर विधानसभा मतदारसंघातून विधानसभेची निवडणूक लढविली होती. एकदा रात्रौ ८ वाजण्याच्या सुमारास नाथ पै डबलसीट घेऊन बेळगांवहून टिळकवाडीला निघाले होते. त्यांना सभेला वेळेवर पोहोचयाचे होते. ग्लोब टॉकीजजवळ आले आणि पोलिसांनी शिट्टी फुंकली. पण नाथ पै यांनी साकल न थांबवता उलट वेग वाढविला. पोलिसाने सायकलने नाथांचा पाठलाग केला; पण नाथ काही हातात लागले नाहीत.

दुसऱ्या दिवशी सकाळी नाथ पै स्वतः कँप पोलिस स्टेशनात हजर झाले आणि तेथील सबइन्स्पेक्टरला म्हणाले, "रात्रौ मी डबलसीटचा गुन्हा केला आहे. तुमच्या पोलिसाने शिटी वाजवली; पण मला खूप महत्त्वाच्या कामासाठी वेळीच पोहोचायचे असल्याने मी थांबलो नाही. याबद्दल मला जो काही दंड करावयाचा असेल तो करावा."

सबइन्स्पेक्टर नाथकडे बघतच राहिले. आपण होऊन पोलिस स्टेशनला हजर होणारा आणि गुन्ह्याची कबुली देणारा हा पहिलात तरुण त्यांना भेटत होता.

सबइन्स्पेक्टर हा प्रामाणिकपणा पाहून चकितच झाले. म्हणाले, "तुमच्या प्रामाणिकपणाबद्दल मी तुम्हाला या खेपेला क्षमा करतो. पण यापुढे परत मात्र असे करू नका."

नाथसारखा प्रांजळपणा व प्रामाणिकपणा दुर्मिळच. कायदा मोडून लोकशाही टिकणार नाही, याची त्यांना जाणीव होती. स्वराज्यातही

अन्यायाविरुद्ध कायदेभंग करावे लागतील याचीही त्यांना जाणीव होती. पूर्वसूचना देऊन न्यायासाठी प्रसंगी कायदे मोडावे हे वेळोवेळी ते स्पष्ट करीत असत. पण दैनंदिन जीवनात कायद्याचे पालन करणे समाजस्वास्थाच्या दृष्टीने प्रत्येकाचे कर्तव्य असल्याचे ते सांगत असत.

## नाथच्या अफाट लोकप्रियतेचे रहस्य

एकदा नाथ पै आपल्या मतदारसंघात गाडीने दौऱ्यावर निघाले होते. दुपारच्या वेळी रस्त्यालगतच्या एका घराच्यासमोर मंडप घातला होता. विवाहविधी सुरू होता. मंगलाष्टके कानावर पडताच नाथने गाडी थांबवायला लावली आणि वधुवरांना आशीर्वाद देण्यासाठी गाडीतून उतरून मंडपात शिरले. योगायोगाने ते घर एका समाजवादी पक्षाच्या कार्यकर्त्यांचे निघाले. यजमान नाथचे स्वागत करायला पुढे येताच नाथने त्याला नावाने हाक मारून सांगितले, “अरे नाना, तू झिलाच्या लग्नाक माका बोलवलंस नाय; पण बघ मी इलय की नाय तुझ्या झिलाक व सुनेक आशीर्वाद देऊक.” नातच्या या उत्तराने तो कार्यकर्ता भारावून गेला. नवरानवरी नाथच्या पाया पडली. त्यावेळी तो आपल्या सुनेला म्हणाला, “मुली, तु भाग्यवान आसंस. नाथ पैसारख्या मोठ्या माणसाचे आशीर्वाद तुका लाभलेत आणि तुझ्यामुळे त्याचे पाय आज आमच्या घराक लागले. ह्या आमचाही मोठा भाग असा.”

नाथ पै यांची स्मरणशक्ती विलक्षण होती. एकदा कुणाही कार्यकर्त्यांची त्याला ओळख करून दिली की, त्याचे नाव आणि चेहरा ते कधीच विसरत नसत. कार्यकर्त्यांचा मान आणि शान राखण्यात नाथ पै सदैव दक्ष असत. नाथच्या मतदारसंघात कुठल्याही गावात नाथची सभा असली की त्या सभेत त्या गावातील आपल्या कार्यकर्त्यांचा न चुकता गौरवाने आपल्या भाषणात उल्लेख करीत. चार-पाच वर्षांपूर्वी परिचय करून दिलेल्या त्या गावातील कार्यकर्त्यांचे चेहरे आणि नावे नाथच्या कशी लक्षात राहत याबद्दल सर्वांनाच आश्चर्य वाटायचे. या आचाट स्मरणशक्तीचा नाथने संघटनात्मक बांधणीसाठी कुशलतेने पुरेपूर वापर करून घेतला. प्रत्येक गावातील जाहीरसभेत त्या गावातील पक्षाच्या कार्यकर्त्यांचा आवर्जून उल्लेख करून या कार्यकर्त्यांच्या

कार्यामुळे-कष्टामुळे आपण लोकसभेत निवडून गेलो आहोत याचा ते कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत. नाथ पै यांच्या अफाट लोकप्रियतेमागील हे एक प्रमुख रहस्य होते.

## नाथ पै यांच्या वक्तृत्वाचे विविध पैलू

बॅ. नाथ पै यांचे सात-आठ भाषांवर प्रभुत्व होते. संस्कृत, मराठी, हिंदू, उर्दू या भारतीय भाषांवर आणि इंग्रजी, फ्रेंच आणि जर्मनी या परदेशी अशा सात भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. त्याचप्रमाणे कानडी, कोकणी आणि गुजराती या भारतीय भाषाही त्यांना येत होत्या.

मुंबईत आशियायी समाजवादी परिषद झाली. ब्रह्मदेश, इस्रायल आणि नेपाळ या तीन देशाचे पंतप्रधान या परिषदेला उपस्थित होते. या परिषदेच्या निमित्ताने मुंबईत गिरगांव चौपाटीवर जाहीरसभेचे आयोजन करण्यात आले होते. या जाहीरसभेचे स्वागत, प्रास्ताविक आणि सूत्र संचालन बॅ. नाथ पै यांनी केले होते. सभेला अफाट गर्दी जमली होती. सभेला मराठी आणि हिंदी भाषा जाणणारे बहुसंख्येने उपस्थित होते. तसेच इंग्रजी भाषा जाणणारे विदेशी नागरिकही मोठ्या संख्येने उपस्थित होते.

त्या दिवशी आपल्या स्वागताच्या तसेच प्रास्ताविकाच्या भाषणात; तसेच सूत्र संचालनात बॅ. नाथ पै यांनी इंग्रजी, हिंदी आणि मराठी या तिन्ही भाषांचा वापर करून आपल्या वक्तृत्वाचे एक आगळेवेगळे दर्शन श्रोत्यांना घडविले.

१९५७च्या निवडणुकीचे वेळी सावंतवाडी विधानसभा मतदारसंघातील संयुक्त महाराष्ट्र समितीचे उमेदवार सावंतवाडीचे राजे शिवरामराजे भोसले यांच्या निवडणूक प्रचारासाठी नाथ पै यांनी सावंतवाडी तालुक्याचा दौरा केला. दुपारी सावंतवाडी-बांदा मार्गावरील इन्सुली या मोठ्या गावात प्रचाराची सभा होती. या सभेत नाथच्या एका मित्राने नाथने सभेत श्रोत्यांना प्रथम रडवावे आणि नंतर हसवावे असे सुचविले. नाथने सांगितले की, ही गोष्ट सहजसाध्य होण्यासारखी नाही. पण प्रत्यक्षात इन्सुलीच्या सभेत नाथने ही किमया घडवून दाखविली. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनातील हुतात्म्यांच्या करुण कहाण्यांचे कथन सुरू करताच अनेकांचे डोळे पाणावले आणि काही

महिलांना हुंदके आवरता आले नाहीत. त्यानंतर पाचच मिनिटांच्या कालावधीत नाथ पै यांनी राजकारणातले असे काही विनोदी किस्से श्रोत्यांना ऐकविले की, श्रोत्यांना हसू आवरता येईना.

नाथ पै यांच्या असामान्य वक्तृत्वाचे दर्शन त्या सभेत श्रोत्यांना घडले.

## नाथच्या कविमनाचे दर्शन

गोवा मुक्त झाल्यावर नाथ पै यांनी गोव्यातील प्रतिभावान ज्येष्ठ कवी. श्री. बा. भ. बोरकर यांना त्यांच्या कवितेतील एक ओळ तारेने कळवून अभिनंदन केले.

कवितेचे बोल होते, 'त्रिवार मंगल आजला त्रिवार मंगल.'

कविवर्य बा. भ. बोरकर यांनी त्याच कवितेतील दुसरी ओळ उद्‌धृत करून नाथ पै यांना उत्तर पाठविले.

कवितेचे बोल होते, 'धन्य जाहलो मीही याचा घेऊन साक्षात्कार.'

नाथ पै यांच्या कविमनाचे दर्शन या प्रसंगातून घडले आहे. नाथला लिहिण्याचा कंटाळा होता. नाथचे अक्षर चांगले नव्हते हे त्याचे कारण असावे. पण वाणीबरोबर नाथला लेखणीची जोड मिळाली असती तर नाथ पै श्रेष्ठ साहित्यिक झाले असते.

## धनिकांचा मिंधेपणा कधीच स्वीकारला नाही.

१९६२च्या निवडणुकीचे वेळी श्री. बिर्लाशेठ यांनी श्री. वासूदेशपांडे यांच्या पत्त्यावर नाथ पै यांना निवडणूक खर्चासाठी दहा हजार रुपयांचा चेक पाठविला होता. पैशांची खूप गरज होती; पण नाथ पै यांनी तो स्वीकारला नाही. तो परत पाठविला. ती रक्कम नाथ पै यांनी वेंगुर्ल्याच्या खर्डेकर महाविद्यालयाला द्यावी असे कळविले. त्याप्रमाणे बिर्लाशेठनी ती रक्कम निवडणुकीनंतर वेंगुर्ला कॉलेजला दिली.

नाथचे अनेक धनिक मित्र होते. त्यांचेशी त्यांचे खूप घनिष्ट संबंध होते. पण भांडवलदारांचे पैसे घेऊन ते त्यांचे मिंधे मात्र कधीच झाले नाही.

## वक्तृत्वाच्या यशाची गुरुकिल्ली

नाथ पै यांना आवाजाची आणि वक्तृत्वाची ईश्वरी देणगी लाभली असली; तरी व्यासंगाने आणि परिश्रमाने त्यांनी ती प्रभावी आणि परिणामकारक बनविली होती. कोकणचे ज्येष्ट समाजवादी नेते श्री. सखाराम रावजी शिखरे ऊर्फ शिखरेगुरुजी यांनी यासंबंधी नाथ पै यांना विचारले असता नाथ पै म्हणाले,

“चांगल्या आवाजाची देणगी मला लाभली ही ईश्वरी कृपा. पण चांगला आवाज नसता तरीसुद्धा मी प्रभावी वक्ता झालो असतो. ज्या विषयावर बोलायचे त्याचे सखोल वाचन व चिंतन पाहिजे. तुम्ही त्या विषयाशी एकरूप झालात म्हणजे शब्दांसाठी तुम्हाला अडून राहावे लागत नाही. ते आपोआप ओठाकडे धाव घेतात. मी केवळ तोंडाने बोलत नसतो. माझे शरीर-त्याचा प्रत्येक अवयव बोलत असतो. मलाखरोखर देहाचे भान नसते. म्हणूनच एका तासाच्या भाषणानंतर मी घामाघूम होऊन थकतो.”

वरील वक्तव्यात नाथने आपल्या वक्तृत्वाच्या यशाची गुरुकिल्ली स्वतःच सांगितली आहे,

## ‘मी’पणाचा कंटाळा

नाथ पै स्वतःबद्दल फार थोडे बोलत आणि फार थोडे लिहीत असत. क्वचितच बोलत असत. नाथ इंग्लंडला असताना श्री. वासू देशपांडे यांनी नाथला त्यासंबंधी लिहिले होते. स्वतःबद्दल त्यांनी लिहावे असे पुन्हापुन्हा आर्जवपूर्वक लिहिले होते. पण नाथचे उत्तर आले.

उत्तरात नाथ पै यांनी लिहिले होते, “माझ्याविषयी मीच लिहावे, हे माझ्या मनाला पटत नाही. माझ्याविषयी जाणून घ्यावयास तू उत्सुक आहेत असे तू लिहितोस, पण ‘मी’ हा विषय मला मोठा कंटाळवाणा व खरे सांगायचे तर फार मोठा भयानक वाटतो.”

असा होता नाथचा स्वभाव. स्वतःबद्दल दुखले-खुपले तरी स्वतःबद्दल फारसे बोलायचे नाही हा नाथचा स्थायी भाव होता.

## मृत्यूचे महाकाव्य कथन करणारे विलक्षण पत्र

युनोस्कोच्या मानवी हक्क समितीवर अनेक वर्षे नाथ पै सदस्य होते. ऑक्टोबर १९६८ मध्ये जिनिव्हाला या समितीच्या बैठकीला गेले असता त्यांनी प्रकृती बिघडली. लघवीतून रक्त जाऊ लागले होते. त्यांना हॉस्पिटलमद्ये दाखल करण्यात आले. त्यांनी मुंबईचे प्रजा समाजवादी पक्षाचे नेते डॉ. जी. जी. पारीख यांना इंग्रजीत पत्र पाठविले. या पत्रात नाथ पै म्हणतात-

“येथे आल्याच्या दुसऱ्याच दिवशी मला अनपेक्षितपणे नेहमीपेक्षा काही वेगळ्या प्रकारची भोवळ आली. डॉक्टरना तातडीचे बोलवाले लागले. फारसे गंभीर काही नाही; पण मला अंथरुणावर चोवीस तास झोपून राहण्याची आज्ञा देण्यात आली.”

“खरेच ही आजारपणे माझ्या आयुष्यातील एक दुष्ट शत्रू ठरत आहेत. मी त्याला जुमानीत नाही, त्याकडे दुर्लक्ष करतो, त्याची मुर्वत ठेवीत नाही. त्याची पर्वा करीत नाही, पण तरी ते आहेत. मला ते अडथळा आणीत आहेत. मला फरफटत ओढून नेत आहे. तो माझा शत्रू-माझा कधी पराभव करू शकणार

नाही. त्याला विजय एकदाच आणि अखेरीस प्राप्त होईल. पण मला तीव्र बोचणी, दुःख आणि घोर निराशा वाटते, कारण मनाजोगते मी काही करू शकत नाही, कामाचा उरक दाखवू शकत नाही. माझी ही तीव्र इच्छा-उत्कंठा माझ्या फारच थोड्या सहकाऱ्यांना जाणवत असावी. मृत्यू जेव्हा जेव्हा माझ्या अगदी जवळ येऊन गेला, त्या त्या वेळी जे जे मला प्राणप्रिय, जे जे आदरणीय त्यांच्या आठवणीने माझ्या जीवाची कालवा-कालव झाली. भारतमाता, जन्मदात्रीमाता, माझी गोजिरवाणी मुले आणि क्रिस्टल- या सर्वांवर माझा जीव. त्यांच्या ताटातुटीच्या विचाराने मी व्याकूळ होतो. पण भीतीचा लवलेशही मला कधी शिवला नाही. मृत्यूचे सतत अव्याहत मिळणारे आवाहन झिडकारणे हाच जगण्याचा एकमेव मार्ग आहे.

*At my ear*
*I always hear*
*Times winged chariot*
*Drawing near*

(माझ्या कानांजवळ, मी सतत ऐकत असतो, काळाच्या (मृत्यूच्या) पंख लावलेल्या रथाची, जवळ येण्याची चाहूल)

परंतु हे झिडकारणे माझ्या मर्यादित शारीरिक शक्तीला काही नव्या ताकदीचा पुरवठा करू शकत नाही. त्यामुळे माझ्या वागण्याला एक वळण लागते आणि परिणती शक्ती घटण्यातच होते. मी तुला (किशोरला) हे लिहिले; कारण तुम्ही मला राजकीय सहकारी, कार्यकर्ता यापेक्षा अधिक काही मानता व मला तसे वागवता."

मृत्यूचे महाकाव्यकथन करणारे हे विलक्षण पत्र. आपला मृत्यू जवळ येत चाललेला आहे याची जाणीव नाथ पैना अखेरच्या काळात झाली. मृत्यू अनेक वेळा जवळ येऊन परत गेला होता. त्याचा जीवघेणा खेळ चालू होता. नाथांची ध्येवादी तळमळ प्रखर म्हणून जवळ घेऊन आपल्या ध्येयवादाची वाटचाल ते करीत होते.

अखेरच्या काळात त्यांचे जवळचे सहकारी श्री. वासू देशपांडे यांना नाथ पै म्हणाले, "माझे अचानक काहीतरी होणार, तेव्हा क्रिस्टलला, मुलांना व्हिएन्नाला जाण्याशिवाय मार्ग राहणार नाही."

आपले दुखणे हे जीवघेणे आहे हे नाथ पै यांना माहीत असल्याने नाथने या प्रश्नावर सौ. क्रिस्टलशीही खूप वेळा चर्चा केली होती व आवश्यक त्या सूचना देऊन ठेवल्या होत्या.

## उदात्त हृदयाचा उपासक

कोकणातील ज्येष्ठ समाजवादी नेते साथी शिखरेगुरुजी यांचे इंग्रजी भाषेवर प्रभुत्व होते. नाथ पै आणि त्यांचा इंग्रजीतून पत्रव्यवहार चालत असे. नाथने मृत्यूपूर्वी काही दिवस शिखरेगुरुजींना पत्र पाठविले होते; त्या पत्रात नाथ पै यांनी लिहिले होते, *“There are commands higher than the advice of the doctors and life assumes a meaning only to the extent we are able to obey them.”* (जीवनामध्ये काही आज्ञा डॉक्टरांच्या सहाय्यापेक्षा श्रेष्ठ ठरतात आणि या आज्ञांची पूर्तता आपण किती प्रमाणात करतो, त्यावर जीवनाला काही अर्थ प्राप्त होत असतो.)

हे पत्र म्हणजे नाथ पै यांच्या जीवनाचा सार आहे.

यापूर्वीही नाथ पै अनेकवेळा म्हणाले होते, “माणूस ज्या हृदयाने खऱ्या अर्थाने जगतो ते हृदय वेगळे असते. डॉक्टरांच्या इंजेक्शनने तो जगत नाही. उदात्त गोष्टीसाठी झोकून देण्यातच ते हृदय जगत असते. स्पंदन पावते, मी त्या हृदयाचा उपासक आहे. हे असले उदात्त हृदय घेऊन आपले आयुष्य मी जगलो.”



## वैवाहिक जीवन

कायद्याचा अभ्यास करण्यासाठी नाथ पै यांचे ब्रिटनमध्ये वास्तव्य असताना ब्रिटनमधील लेबर पार्टीच्या कार्यात आणि कामगार चळवळीत त्याचा सक्रिय सहभाग असे. ब्रिटनमधील या वास्तव्यात नाथ पै यांना कामगार चळवळीचा (Labour Movement) अभ्यास करण्यासाठी युरोपमधील ऑस्ट्रिया सरकारची शिष्यवृत्ती मिळाली. कामगार चळवळीच्या अध्यायनासाठी नाथ पै यांचे वास्तव्य काही काळ ऑस्ट्रियाच्या राजधानीत 'व्हिएन्ना' शहरात होते. युरोपातील एक सुंदर शह अशी व्हिएन्नाची प्रसिद्धी आहे. राजकारणाइतकीच नाथ पैना साहित्य कला, संगीत आणि सौंदर्याची आवड होती. नाथला आवडले ते व्हिएन्नाचे संगीत. संगीताची विश्वाची राजधानी (Music Capital of the World) ही संज्ञा या शहराला सर्वार्थाने शोभून दिसते असे नाथचे मत होते. याच शहराने नाथला एख अमोल रत्न दिले. या रत्नाने नाथच्या हृदयात अढळ स्थान मिळविले. या रत्नाचे नाव होते 'क्रिस्टल मुशेल'

'क्रिस्टल मुशेल' ही ऑस्ट्रियन सरकारच्या सचिवांची एकुलती एक कन्या. व्हिएन्नाच्या वास्तव्यात नाथचा क्रिस्टलशी परिचय झाला. क्रिस्टलला एक भाई होता. पण दुसऱ्या महायुद्धात तो मारला गेला होता. नाथच्या व्यक्तिमत्त्वाचा क्रिस्टलवर प्रभाव पडला आणि क्रिस्टलच्या स्वभावामुळे नाथला क्रिस्टलची ओढ लागली. परिचयाची परिणती पुढे प्रेमात झाली आणि ती दोघे विवाहबद्ध झाली. पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतीचा विलोभनीय संगम त्यांच्या जीवनात घडून आलेला पाहायला मिळतो.

नाथने परदेशी युवतीश विवाह केला म्हणून त्याच्या मतदारसंघातील काही मंडळी थोडीशी नाराज झाली होती. नाथला भारतात कुणी विवाहयोग्य युवती सापडली नसती काय? हा विवाह यशस्वी होणार आहे काय? अशी कुजबूज पाठीमागून चालायची. पण कुणाही भारतीय नारीपेक्षा आपण काकणभरही कमी नाही हे क्रिस्टलने कृतीने सिद्ध केले. नाथच्या जीवनाशी क्रिस्टलताई सर्वाथाने एकरूप झाली होती.नाथाच्या मृत्युनंतरही नाथ पै यांनी

जी जीवनमूल्ये उराशी बाळगळी होती त्यांचे काटेकोरपणे आचरण क्रिस्टलताईने आपल्या उर्वरित आयुष्यात केले आहे.

हृदयविकार हा पै घराण्याला मिळालेला शाप होता. नाथही याला अपवाद ठरला नाही. चाळीशी उलटल्यावर नाथलाही हृदयविकाराच्या व्याधीने गाठले. क्रिस्टलची जबाबदारी खूप वाढली होती. नाथला जरा बरे वाटले की त्याची धावपळ सुरु व्हायची. थोड्या हट्टी स्वभावामुळे त्याला आवर घालणे अवघड व्हायचे. नाथच्या आजारपणात खूप चढउतार होत असत. पण क्रिस्टलताईने धीर सोडला नाही. नाथची प्रकृती बिघडली की क्रिस्टल अस्वस्थ होत असे. पण चित्त विचलित होऊ न देता स्थिर चित्ताने त्या नाथची सेवा करीत. सेवेत यत्किंचितही उणीव पडू देत नसत.

नाथचे मोठे बंधू अनंतराव पै यांच्या निधनाचेवेळी पै कुटुंबीयावर मोठा बिकट प्रसंग ओढवला होता. अनंतरावांना आणि नाथला एकाच वेळी हृदयविकाराचा झटका आल्याने मुंबईत एकाच हॉस्पिटलमध्ये दोन वेगवेगळ्या वॉर्डात दाखल करण्यात आले होते. नाथची स्थिती काळजी करण्यासारखी असतानाच अनंतरावांचे निधन झाले होते. हॉस्पिटलच्या डॉक्टर्सनी ही वार्ता नाथच्या त्या अवस्थेत नाथला कळू न देण्याची दक्षता घेण्यास नाथच्या कुटुंबीयांस बजावले होते. नाथची प्रकृती स्थिरावल्यावर नाथला अनंतररावांच्या निधनाची वार्ता सांगण्यात आली; पण अनंतरावांचे अंत्यदर्शन घडविले नाही म्हणून क्रिस्टलताईंना नाथचा रोष पत्करावा लागला.

नाथच्या प्रकृतीप्रमाणेच घरची इतर कामेही त्या अत्यंत जबबादारीने सांभाळीत. मुलगे ‘दिलीप’ आणि ‘आनंद’ला सांभाळणे, त्यांना शाळेत वेळी पोहोचविणे, त्यांच्या अभ्यासावर लक्ष ठेवणे ही कामेही त्यानी तितक्याच तत्परतेने केली. कामात कधी कुचराई केली नाही की कमाचा कंटाळा केला नाही. कामे करताना त्यांच्या कपाळावर कधी आठी दिसली नाही की कमाबद्दल त्यांनी कधी नाराजी व्यक्त केली नाही. धीरोदात्त आणि सेवापरायण वृत्तीने संसारातील सर्व जबाबदाऱ्या त्यांनी सांभाळल्या. त्या उत्तम गृहिणी होत्या. तशाच नाथच्या खऱ्या अर्थाने सहचारिणी होत्या. नाथच्या सेक्रेटरीचे कामही त्यांनी केले. नाथचा पत्रव्यवहार पाहणे, रोजच्या वर्तमानपत्रातील महत्त्वाची कात्रणे कापून ठेवणे, फायलिंग करणे आणि नाथची पत्रे टाईप

करून रवाना करणे ही सारी कामे त्या वेळच्या वेळी न कंटाळता करीत असत. नाथच्या धावपळीच्या जीवनात त्यांचा खरा आधार नाथला लाभला होता.

सगळी कामे सांभाळून त्या बागकामही करीत. बागकामाची त्यांना मनापासून आवड आहे. नाथलाही फुलांची आवड होती. नाथचा संसार त्यांनी भारतीय नारीपेक्षाही अधिक कुशलतेने आणि उत्तम प्रकारे दृष्ट लावण्याजोगा केला. घर नेहमी स्वच्छ आणि टापटीप ठेवण्याची त्या सदैव दक्षता घेत. कारण नाथची वृत्ती प्रसन्न ठेवण्यासाठी ते आवश्यक होते. त्यांना आळस अजिबात माहीत नव्हता. नाथ चिडले अगर खूप मोठ्याने बोलू लागले की, त्या येऊन नाथला आवरत. एकच वाक्य त्या उच्चारित, “Nath, it is enough now.” (नाथ, आता पुरे). क्रिस्टेलचे हे एकच वाक्य नाथला आवरायला पुरे पडत असे.

भारताचे माजी पंतप्रधान कै. लाल बहादूर शास्त्री यांच्या निधनानंतर त्यांच्या जागेवर त्यांची पत्नी श्रीमती ललितादेवी यांना उभे करण्याचे धाटत होते. पण ललितादेवीनी त्याला साफ नकार दिला. त्यामुळे नाथ पै यांचा ललितादेवीबद्दलचा आदर दुणावला. नाथ पै क्रिस्टलला बरोबर घेऊन ललितादेवींना भेटायला गेले. उभयतांनी ललितादेवींनी घेतलेल्या निर्णयाबद्दल त्यांचे अभिनंदन केले. क्रिस्टललापण आपल्या मृत्यूनंतर लोकसभेत उभे राहण्याचा आग्रह केला तर जपून निर्णय घेण्याचा सल्ला याप्रसंगी नाथने दिला होता आणि घडलेही तसेच नाथ यांच्या निधनानंतर त्यांच्या जागेवर क्रिस्टलला उभे करावे असा विचार काही मित्रमंडळीनी क्रिस्टलसमोर मांडला असता, क्रिस्टलने त्याला साफ नकार दिला. “जी गोष्ट नाथला कदापि आवडली नसती, ती गोष्ट तुम्ही मला का करायला सांगता?” असा प्रश्न तिने त्या संदर्भात भेटायला गेलेल्या मंडळींना केला.

नाथचे निधन झाले त्यावेळी क्रिस्टलताई त्यांच्या जवळ नव्हत्या. नाथच्या अंत्यदर्शनासाठी त्या आल्या तो प्रसंग त्यावेळी तेथे उपस्थित असलेल्या अनेकांच्या स्मरणात असेल. स्थिर नजरेने त्या नाथकडे पाहत होत्या. जणू काही पुढे कायमची दृष्टीआड होणारी नाथची मूर्ती त्या आपल्या डोळ्यात साठवून ठेवत असाव्यात. त्यांचा खिन्न चेहरा, ‘नाथ अखेर तू आम्हांला चकविलेस ना?’ असा भाव व्यक्त करीत होता. दोन वेळा

हृदयविकाराचा तीव्र झटका येऊन गेल्यावरही सार्वजनिक जीवनातील नाथ पै यांची धडपड थांबली नव्हती. स्वस्त बसणे नाथ पै यांच्या स्वभावाला मानवणारे नव्हते. त्यामुळे केव्हातरी या प्रसंगाला सामोरे जावे लागणार यांची त्यांना पूर्वकल्पना असावी. परिमाणी या प्रसंगाला सोमोरे जाण्याची त्याची मानसिकता तयार झाली असावी. नाथच्या निर्वाणाचा धक्का त्यांनी मोठ्या धीरोदत्त वृत्तीने सोसला.

क्रिस्टलच्या मनाचा मोठेपणा नाथाच्या मृत्यूनंतरच दिसून आला. नाथच्या निधनानंतर घरात दहा हजार रुपये असलेले एक पाकीट क्रिस्टलताईना सापडले. त्या पाकिटावर नाथने 'निवडणूक खर्चासाठी' असे लिहून ठेवले होते. नाथच्या चाहत्याने नाथला निवडणूक खर्चासाठी दिलेली ती रक्कम क्रिस्टलताईने नाथ पै यांच्या जागी पक्षाने उभे केलेले पक्षाचे उमेदवार प्रा. मधु दंडवते यांच्या स्वाधीन केली. प्रा. मधु दंडवते यांनी ती रक्कम स्वीकारण्यास नकार दिला असता, 'निवडणूक निधीसाठी पक्षाला दिलेली ती रक्कम मी घरात वापरली तर नाथच्या आत्म्याला काय वाटेल?' असा प्रश्न करून क्रिस्टलताईने ती रक्कम प्रा. मधु दंडवते यांना स्वीकारायला लावली. ती रक्कम कुणाला न सांगता क्रिस्टलताईंनी घरात वापरली असती तर कुणी काही विचारलेही नसते. पण नाथच्या सान्निध्यात झालेल्या संस्कारांनी क्रिस्टलताईंनी ती रक्कम प्रा. दंडवतेंच्या स्वाधीन केली. नाथच्या जीवनाशी क्रिस्टलताई किती एकरूप झाल्या होत्या याचे दर्शन या घटनेने घटविले आहे.

बॅ. नाथ पै यांच्या निर्वाणानंतर त्यांच्या समाजवादी मित्रमंडळींनी नाथच्या मुलांच्या शिक्षणासाठी काही रक्कम बँकेत फिक्स करून ती क्रिस्टलताईंच्या स्वाधीन करायचे ठरविले होते. क्रिस्टलताईला हे समजताच त्यांनी या गोष्टीला हरकत घेतली. नाथच्या मुलांचे संगोपन आणि शिक्षणल करायला त्यांची आई म्हणून आपण समर्थ असल्याचे त्यांनी नाथच्या मित्रमंडळींना सांगितले व त्यांनी दिलेला मदतीचा हात स्वाभिमानाने; पण नम्रपणाने नाकारला ही प्रेरणाही त्यांना नाथच्या सहवासातून व कुटुंबीयांकडून मिळाली होती. नाथचे वडील नाथच्या लहानपणी वारल्यावर नाथचे व नाथच्या भावंडांचे संगोपन नाथच्या मातोश्रीने खडतर परिस्थितीतून केले होते. नाथच्या मातोश्रींचा आदर्श त्यांच्यापुढे होता.

नाथच्या मृत्यूनंतर क्रिस्टलने स्वतः नोकरी करून आपल्या मुलांचे संगोपन आणि शिक्षण समर्थपणे केले आहे. नाथच्या मृत्यूनंतर त्यांच्या वृद्ध मातोश्री माहेरी एकट्याच असल्याने त्यांना आधार देण्यासाठी क्रिस्टलताईने आपल्या दोन्ही मुलांसह ऑस्ट्रियाला प्रयाण केले. ऑस्ट्रियाला गेल्या तरी अधूनमधून भारताला भेट देऊन सासरच्या माणसांची विचारपूस करण्याची प्रथा त्यांनी कटाक्षाने पाळली आहे. ऑस्ट्रियात दीर्घकाळ वास्तव्य असूनही त्यांनी तेथील नागरिकत्व स्वीकारलेले नाही. भारतीय नागरिक म्हणून त्या तेथे राहत आहेत.

पै कुटुंबाला हृदयरोगाचा शाप असल्याचे दिसून येते. तसेच पत्नीच्यापूर्वी पुरुषांनी जगाचा निरोप घेण्याचाही शाप असल्याचे दिसून येते. नाथच्या लहानपणी नाथचे वडील वारले होते आणि नाथची व नाथच्या भावंडांची जबाबदारी नाथच्या मातोश्रीना स्वीकारावी लागली होती. नाथची मुले वयात येण्यापूर्वीच नाथने या जगाचा निरोप घेतला आणि मुलांच्या संगोपनाची व शिक्षणाची जबाबदारी नाथच्या पत्नीला स्वीकारावी लागली. नाथचे दोन बंधूही त्यांच्या सहधर्मचारिणीना मागे ठेवून या जगाचा निरोप घेऊन गेले आहेत. पै कुटुंबीयांच्या दोन पिढ्यांमध्ये ही परंपरा चालत आली आहे. हा एक विलक्षण योगायोग मानावा लागत आहे.

युरोपियन संस्कृतीत वाढलेल्या क्रिस्टल पैनी नाथच्या सहवासात भारतीय संस्कृतीमधील शिष्टाचार व प्रथा आत्मसात करून आर्य स्त्रीपेक्षा आपण काकणभरही कमी नसल्याचे कृतीने आणि कर्तृत्वाने सिद्ध केले आहे. नाथच्या जीवनातील क्रिस्टलच्या सहवास नाथला सुखावह झाला होता. नाथच्या जीवनाशी ती एकरूप झाली होती. सहधर्मचारिणी म्हणून नाथचे क्रिस्टलची केलेली निवड सर्वतोपरी सुयोग्य ठरली आहे. पती निधनानंतर आर्य स्त्रीच्या वाट्याला येणारे दुःखही क्रिस्टलताईला सोसावे लागले आहे. कुठल्याही प्रकारे कुरकूर न करता क्रिस्टलने सारे कष्ट सोसले आहेत. यातच तिचा मोठेपणा दिसून आला आहे. नाथला समजून घेऊन त्याचे सारे करणारी क्रिस्टलसारखी सहधर्मचारिणी नाथला लाभली हे नाथचे भाग्यच होय. नाथच्या यशात क्रिस्टलचा सहभाग सर्वाधिक आहे.



# अखेरची वाटचाल

जानेवारी १९७१ मध्ये आपल्या देशाच्या तत्कालीन पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी लोकसभेची मध्यावधी निवडणूक घेण्याचा निर्णय जाहीर केला आणि देशात निवडणुकीचे वारे वाहू लागले. बॅ. नाथ पै यांची समाजवादी पक्षाच्यावतीने राजापूर मतदारसंघातून उमेदवारी निश्चित झाली होती. यापूर्वी १९५७, १९६२ आणि १९६७ याप्रमाणे तीन वेळा नाथ पै या मतदारसंघातून लोकसभेवर निवडून गेले होते. यावेळी बॅ. नाथ पै यांच्या विरोधात कॉंग्रेस पक्षाने सावंतवाडी संस्थानचे राजे शिवराम सावंतभोसले यांची उमेदवारी निश्चित केली होती. पाकिस्तानच्या विरोधात बांगलादेशाची लढाई इंदिरा गांधींनी जिंकली होती. या पार्श्वभूमीवर राजापूर लोकसभा मतदारसंघतील ही निवडणूक अटीतटीची होणार हे निश्चित झाले होते. बॅ. नाथ पै यांना या निवडणुकीपूर्वी दोनवेळा हृदयविकाराचा तीव्र झटका येऊन गेला होता. त्यामुळे या निवडणुकीची दगदग नाथना सोसेल की नाही याबद्दल आम्ही त्यांचे सर्व सहकारी साशंक होतो. नाथवर निवडणुकीच्या प्रचाराचा ताण कमीतकमी पडावा अशाप्रकारे निवडणूक प्रचाराची मोहीम आयोजित करण्याचे पक्षाने ठरविले होते. प्रा. मधु दंडवते यांनी या निवडणूकीत प्रचारात नाथ पै यांच्या समवेत सतत राहायचे. नाथ पै यांनी थोडक्यात मतदारांना आवाहन करायचे आणि प्रचाराचा प्रमुख भार प्रा. मधु दंडवते यांनी सांभाळायचा असे ठरले होते.

बॅ. नाथ पै यांनी निवडणुकीची पूर्वतयारी सुरू केली होती. दि. १८ जानेवारी १९७१ रोजी वेंगुर्ले येथे श्रीदेव रामेश्वरला श्रीफळ अर्पण करून प्रचाराची पहिली सभा वेंगुर्ल्यात घेण्याचे निश्चित झाले होते. जानेवारी महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात कार्यकर्त्यांच्या गाठीभेटी घेण्यासाठी नाथ पै यांनी राजापूर लोकसभा मतदारसंघाचा धावता दौरा केला. त्याकाळात नाथच्या निवडणूक प्रचारासाठी मुंबईवासी समाजवादी परिवारातील असंख्य कार्यकर्ते स्वखर्चाने राजापूर लोकसभा मतदारसंघात नाथच्या निवडणूक प्रचारासाठी येत असत. देवगडचे माजी आमदार साथी रामभाऊ मुंज यांचे थोरले बंधू त्यावेळी रजा घेऊन नाथच्या प्रचारासाठी आले होते. नाथला

भेटण्यासाठी खाजगी गाडीने ते निघाले असता त्यांच्या गाडीला भीषण अपघात होऊन ते जखमी झाले. अपघाताची वार्ता कळताच नाथ पै तातडीने अपघातस्थळी दाखल झाले. त्यावेळी जखमींना उपचारासाठी रत्नागिरीच्या सिव्हील हॉस्पिटलमध्ये एस.टीच्या गाडीने येण्याची तयारी चालली होती. नाथ पै एस.टी.च्या त्याच गाडीतून मुंज आणि इतर कार्यकर्त्यांसमवेत रत्नागिरीला गेले. जखमींना रत्नागिरीच्या सिव्हिल हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आले. दुर्दैवाने श्री. मुंज यांचे हॉस्पिटलमध्येच निधन झाले. मुंज यांचे निधन हा था पै यांच्या मोठाच अघात होता.

दुसऱ्या दिवशी दिनांक १६ जानेवारी रोजी नाथ पै यांना दशावतारी नाट्य महोत्सवाच्या उद्‌घाटनासाठी मुंबईला पोहोचायचे होते. म्हणून राजापूरमार्गे बेळगांव गाठून विमानाने ते मुंबईला जाणार होते. राजापूरला पोहचताच राजापूरचे डॉ. प्रभात कुलकर्णी यांनी नाथला पाहताच नाथची प्रकृती चांगली नसल्याचा त्यांना संशय आला. त्यांनी नाथला तपासून पूर्ण विश्रांती घेण्याचा सल्ला दिला; पण दुसऱ्या दिवशी मुंबईला पोहोचणे आवश्यक असल्याने त्यांचा सल्ला न मानता ते बेळगांवला रवाना झाले. या प्रवासात त्यांची प्रकृती खालावली म्हणून उपचारासाठी डॉ. प्रभात कुलकर्णी त्याच गाडीतून नाथबरोबर बेळगावपर्यंत गेले. दुसऱ्या दिवशी १६ जानेवारी १९७१ रोजी बेळगावहून सकाळच्या विमानाने नाथ पै मुंबईला रवाना झाले.

मुंबईत विमानतळावर नाथला उतरवून घेण्यासाठी मालवण तालुका मित्रमंडळाचे अध्यक्ष व ज्येष्ठ समाजवादी कार्यकर्ते साथी बबन डिसोजा उपस्थित होते. नाथच्या प्रकृतीवर प्रवासाचा व दगदगीचा खूपच ताण पडला होता. नाथची अवस्था बघून डिसोजाही थोडे अस्वस्थ झाले. मुंबईत नाथचे वास्तव्य नेहमी त्यांचे मामा डॉ. श्रीरंग आडारकर यांच्याकडे असायचे, पण यावेळी आडारकर यांचेकडे न जाता त्या दिवशी दुपारी त्यांनी आपला मुक्काम बांद्याला प्रा. सदानंद ऊर्फ अनु वर्दे यांच्या निवासस्थानी ठेवला होता. नाथ पै यांना मासे अतिशय आवडत. त्यादिवशी दुपारी वर्दे यांच्या निवासस्थानी त्यांच्या आवडत्या बांगड्याच्या कालवणाचा आस्वाद त्यांनी घेतला. सायंकाळी परळला मालवण तालुक्यातील चौके गावातील हायस्कूलच्या मदतीसाठी दशावतारी नाट्य महोत्सव आयोजित करण्यात आला होता. दशावतारी

नाटके व दशावतारी नाट्य कलाकार यांच्याविषयी नाथ पै यांना आत्यंतिक जिव्हाळा होता. नाथ पै दशावतारी नाट्यकलावंताचे दैवतच होते. रात्रौ दशावतारी नाट्य महोत्सवाचे नाथने उद्‌घाटन केले. दुसरे दिवशी सकाळी १७ जानेवारीला हुतात्मा दिनाच्या सभेसाठी विमामाने बेळगांवला जायचे होते, त्यामुळे थोडा वेळ नाटक पाहून रात्रौ ११.०० वाजता झोपायला डॉ. श्रीरंग आडारकर यांच्या निवासस्थानी गेले.

आडारकर यांच्या घरी गेल्यावर त्यांना होत असलेल्या त्रासाची यत्किंचीतही जाणीव त्यांनी कोणाला होऊ दिली नाही. नाथला बरे नसल्याचा डॉ. आडारकरांना जराही संशय आला असता तर त्यांनी दुसर्‍या दिवशी सकाळी नाथला बेळगावला जाऊच दिले नसते, याची नाथला पूर्ण जाणीव होती. नाथ, राजकारणात पडला नसता तर मराठी रंगभूमीवरील एक उत्कृष्ट नट म्हणून उदयाला आला असता, इतके नाथ पै यांच्याकडे अभिनय कौशल्य होते. खाजगीत अनेकवेळा अनेक राजकीय पुढार्‍यांच्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण हावभावासह आणि आवाजासह त्यांच्या नकला आम्हाला नाथ पै करून दाखवीत असत. खाजगीत नाथबरोबर गप्पागोष्टी मारण्यात अलभ्य लाभ असे. त्यादिवशी रात्रौ डॉ. आडारकरांना आपली प्रकृती चांगली असल्याचे भासविण्यात नाथ यशस्वी ठरले होते. पण त्यादिवशी रात्रौ आडारकरांच्या घरी त्याला पोहोचविण्यास त्याच्या समवेत गेलेल्या प्रा. सदानंद वर्दे व साथी बबन डिसोजा यांच्यापैकी प्रा. सदानंद वर्दे यांना नाथ यांनी त्या रात्री आपल्याबरोबर थांबायला सांगितले. यापूर्वी नाथ यानी त्यांच्यासमवेत रात्रौच्या मुक्कामाला कधी कोणाला थांबवून घेतले नव्हते. डॉ. आडारकरांना वाटले की, वर्दे यांच्यासमवेत नाथला निवडणुकीच्या संदर्भात काही बोलायचे असेल म्हणून नाथने वर्दे यांना थांबवून घेतले असावे. वर्दे यांच्यासमवेत आडारकरांच्या घरी गेलेल्या साथी बबन डिसोजाने नाथला दुसरे दिवशी सकाळी विमानतळावर भेटतो असे सांगून नाथचा निरोप घेतला.

दिनांक १६ जानेवारी १९७१ची नाथ पै यांची डॉ. आडारकर यांच्या निवासस्थानामधील रात्र ही नाथ पै यांच्या निर्वाणाच्या पूर्वीची आदलीरात्र ठरली. त्या रात्री नाथ पै अस्वस्थ होते. बराच वेळ अंथरुणात ते तळमळत होते. मध्यरात्रीनंतर त्यांनी प्रा. सदानंद वर्दे यांजकडून कंपोजची गोळी मागून

घेतली आणि ती सेवन करून ते झोपी गेले. नाथची ही अवस्था पाहून प्रा. वर्दे यांनी सकाळीच साथी बबन डिसोजाला फोन करून नाथबरोबर विमानाने बेळगावला जाण्याच्या तयारीने विमानतळावर येण्यास सांगितले. त्यांच्या सूचनेप्रमाणे नाथबरोबर बेळगावपर्यंत जाण्याच्या तयारीने साथी बनन डिसोजा विमानतळावर दाखल झाले.

नेमक्या त्याच दिवशी भारताच्या तत्कालीन पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी दिल्लीहून मुंबईला यावयाच्या होत्या, त्यामुळे त्यांचे विमान येईपर्यंत मुंबईहून निघणारी सर्व विमाने मुंबईच्या विमानतळावर थांबवून ठेवण्यात आली होती. पंतप्रधानांचे स्वागत करण्यासाठी महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री नामदार वसंतराव नाईक तसेच त्यांचे सहकारी मंत्री आणि काँग्रेसचे नेते विमानतळावर आले होते. प्रत्येकजण नाथला पाहताच त्यांची विचारपूस केल्याशिवाय पुढे जत नसे. यावेळी काँग्रेसच्या पुढाऱ्यांना, ‘स्वतःला समाजावादी म्हणवता आणि माझ्याविरुद्ध एका संस्थानिकाला उभे करता.’ म्हणून खडसवीत होते. नाथला याचा मानसिक त्रास होत होता म्हणून त्यांच्यासमवेत असलेले बबन डिसोजा त्यांना शांत करण्याचे प्रयत्न करीत होते, पण त्याचा काही उपयोग होत नव्हता, तेवढ्यात हैद्राबादला जाण्यासाठी मुंबईचे विख्यात हृदयरोग तज्ज्ञ डॉ. टी. एच. तुळपुळे विमानतळावर दाखल झाले. त्यांना पाहताच साथी बबन डिसोजा धावतच त्यांच्याजवळ गेले आणि विमानतळावर नाथला तपासण्याची त्यांनी विनंती केली. डॉ. तुळपुळे यांनी ताबोडतोब नाथ पै यांना विमानतळावर पोलिस कक्षेत नेले आणि तपासले व तपासून नाथ पै यांना ताबडतोब हॉस्पिटलमध्ये दाखल होण्याचा सल्ला दिला. पण त्यांचा सल्ला ऐकण्याच्या मनःस्थितीत नाथ पै नव्हते. त्यांनी डॉ. तुळपुळे यांना स्पष्टपणे सांगितले, कोणत्याही परिस्थितीत मला आता बेळगावंला जाणे आवश्यक आह. काही औषधे व इंजेक्शने द्यायची असतील तर द्या, अशी विनंती त्यांनी डॉ. तुळपुळ यांना केली. त्याक्षणी प्रवासाला निघालेल्या डॉ. तळपुळे यांच्याकडे नाथला देण्याजोगी कोणतीही औषधे नव्हती. त्यांनी लागलीच विमानतळानजीक राहणाऱ्या डॉ. नरदे यांना फोन करून काही औषधे पाठविण्यास सांगितले. विमानतळाकडे येणारे सर्व रस्ते पोलिसांनी रोखून धरल्याने डॉ. नरदे वेळेवर विमानतळावर पोहोचू

शकले नाहीत. त्यामुळे डॉ. तुळपुळे विमानतळावर नाथ पैंवर काही उपचार करू शकले नाहीत. डॉ. तुळपुळे यांनी लगेच इंडीयन एअरलाईन्सला विनंती करून बेळगावला जाणाऱ्या विमानात एक डॉक्टर होते. डॉ. तुळपुळे यांनी त्या डॉक्टरांना नाथ पै यांच्या प्रकृतीची संपूर्ण कल्पना दिली आणि गरज भासल्यास कोणते उपचार करायचे याचीही माहिती दिली. तसेच बेळगावला उतरल्यावर त्यांना न्यायला येणाऱ्यांना त्यांच्या प्रकृतीची कल्पना देण्यास सांगितले.

विमानतळावर नाथ पै यांना नेहमी पोचविण्यास जाणारे साथी बनन डिसोजा यावेळी नाथबरोबर विमानात चढले. त्यावेळी त्यांनी बबन डिसोजांना हटकले आणि विचारले, "अरे! तू कोठे निघालास?" त्यावर बबन डिसोजा यांनी त्यांना त्यांच्याबरोबर विमानाने बेळगावला येत असल्याचे सांगितले. त्यावर नात पै मालवणीत बबन डिसोजाला म्हणला, "अरे तू माझ्याबरोबर इलस तर माझी हयसरली कामा कोण करतलो." त्यावर बबनने विचारले, "काय कामा आसत." त्यावर नाथ म्हणाले, "सी. आर. पिंटोच्या छापखान्यात निवडणुकीचा प्रचार साहित्य तयार असा आणि निवडणुकीच्या प्रचारासाठी दोन जीपही तयार आसत. प्रचार साहित्य आणि दोन्ही जीपा घेऊन तू उद्या दुपारपर्यंत वेंगुर्ल्यात पोच." नाथच्या या आदेशावर बबन डिसोजाला नाईलाजाने विमानातून उतरावे लागले. बबन डिसोजा यांना काय माहीत की, नाथ पै यांच्याबरोबरची ती त्यांची अखेरची भेट होती.

साथी बबन डिसोजा विमानातून बाहेर पडल्यावर लागलीच विमानतळावरून बेळगावला डॉ. याळगी यांना फोन करून नाथ पै यांच्या प्रकृतीची कल्पना दिली आणि त्यांना बेळगावला नाथ पैला उतरवून घेण्यासाठी विमानतळावर विनंती केली. डॉ. याळगी त्यावेळी आपल्या दवाखान्यामध्ये आलेल्या पेशंटना तपासत होते. बबन डिसोजाचा फोन येताच पेशंटना तपासायचे सोडून डॉ. याळगी तातडीने आपल्या गाडीने विमानतळाकडे रवाना झाले. विमानतळावर नाथला पाहताच त्याचा फिकट झालेला चेहरा पाहून डॉ. याळगीही मनातून चरकले. त्यांनी लागलीच आपल्या गाडीतून नाथला आपल्या घरी नेले. झोपवून लगेच तपासले आणि पडून राहण्याचा सल्ला दिला. संध्याकाळच्या सभेत बोलण्याची परवानगी

घेऊन डॉ. याळगी यांचा पडून राहण्याचा सल्ला नाथ पै यांनी नाईलाजाने मान्य केला.

मात्र दुपारच्या वेळेत नाथ पै यांनी दूरध्वनीवरून वेंगुर्ल्यात श्री. वासू देशपांडे यांच्याशी व सावंतवाडीत साथी जयानंद मठमर यांच्याशी संपर्क साधून दुसऱ्या दिवशी वेंगुर्ले येथे आयोजित केलेल्या निवडणूक प्रचाराच्या पहिल्या सभेच्या आयोजनाविषयी काही महत्त्वाच्या सूचना दिल्या. जयानंद मठकर यांना त्यांनी सांगितले. यावेळी निवडणूकीचे मध्यवर्ती प्रचार कार्यालय कणकवली येथे ठेवायचे असून त्याची जबाबदारी १९ जानेवारीपासून श्री. जयानंद मठकर व श्री. मधु पानवलकर यांनी सांभाळावयाची आहे. श्री. जयानंद मठकर यांनी नाथ पै यांना फोनवरूनही जबाबदारी स्वीकारायची आपली तयारी असल्याचे सांगितले. दुर्दैवाने दूरध्वनीवरून नाथ पै यांच्यासमवेत झालेले त्यांचे ते अखेरचे संभाषण ठरले.

संध्याकाळी हुतात्मादिनाच्या सभेत नाथ पै यांचे भाषण व्हायचे होते. बऱ्याच कालावधीनंतर नाथ पै बेळगावमध्ये जाहीरसभेत बोलणार होते. त्यामुळे सभेला प्रचंड गर्दी होती. डॉ. याळगी यांनी नाथ पै यांना या सभेत १०-१५ मिनिटांपेक्षा अधिक काळ बोलू नये असा सल्ला दिला होता. पण नाथ पै बोलायला उभे राहिल्यावर त्यांना कोण अडविणार. डॉक्टरांचा सल्ला न जुमानता या सभेत नाथ पै यांनी भावनाविवश होऊन ५५ मिनिटे भाषण केले. आपल्या भाषणात त्यांनी सीमालढ्याची पार्श्वभूमी सांगितली. सीमाप्रश्न सोडविण्यासाठी त्यांनी सतत केलेल्या प्रयत्नांचा आढावा घेतला आणि लोकसभेत सर्व खासदारांना आपलेसे करून बेळगावाला न्याय मिळवून देण्याचा अखेरपर्यंत प्रयत्न करीन असे आश्वासनही दिले. सभा संपल्यावर नाथ पै म्हणाले, “आज माझे मन मी सीमावासियांसमोर मोकळे करून सीमावासियांच्या ऋणातून मुक्त झालो आहे.”

नाथ पै यांच्या जीवनातील ते अखेरचे भाषण ठरले, सभेनंतर नाथ पै विश्रांतीसाठी डॉक्टर याळगी यांच्या निवासस्थानी गेले. त्या रात्री नाथ पै यांच्या खोलीतच नाथ पै यांच्या शेजारी डॉ. याळगीही झोपले. नाथ पैना झोप लागली होती. रात्री १२च्या सुमारास त्यांना जाग आली. त्यावेळी घामाने ते चिंब भिजले होते. त्यांनी लागलीच जवळच झोपलेल्या याळगींना उठविले

आणि म्हणाले, “मित्रांना रात्री असे त्रास देणे मला आवडत नाही, पण मला असह्य त्रास होत असल्याने तुम्हाला त्रास देत आहे.”

डॉ. याळगी यांनी नाथला तपासले. ताबोडतोब आवश्यक ती इंजक्शने दिली आणि लागलीच बेळगावातील विख्यात हृदयरोग तज्ज्ञ डॉ. जी. आर. कुलकर्णी यांनाही बोलावून घेतले. नाथची नाडी अनियमित होती. टेकवून बसल्यावर बरे वाटेल म्हणून तक्क्या देऊन त्यांना बसवून ऑक्सिजन देण्यात आला. पण नाथ पै उपचाराच्या पलीकडे चालले होते.

मध्येच नाथ पै यांनी डॉक्टरना सवाल केलास, “माझी पत्नी क्रिस्टल आणि मुलांना भटता येईल का?” नाथची पत्नी आणि मुले त्यावेळी दिल्लीत होती. दूरध्वनीवरून सौ. क्रिस्टलशी संपर्क साधून मुलांना घेऊन बेळगावला येण्याचा संदेश दिला गेला. नाथचे मोठे बंधू भाऊ पै यांनाही बोलावून घेण्यात आले. तशाही परिस्थितीत नाथ डॉक्टरांना म्हणाले, “मला लगेच बरा करा, उद्या माझी वेंगुर्ल्यात महत्त्वाची सभा आहे, त्या सभेला मला गेलेच पाहिजे.”

पण डॉक्टरी इलाजांचा काहीही परिणाम न होता दि. १७ जानेवारी १९७१ रोजी रात्री १२ वाजून ४५ मिनिटांनी नाथ पै यांची प्राणज्योत विझली. पत्नीची आणि मुलांची अखेरच्या क्षणी काळाने भेट होऊ दिली नाही.

आयुष्यभर दीनदुबळ्यांसाठी, गोरगरीबांसाठी झगडणारा, झुंजणारा, झुंजार सेनानी, लोकसत्तेचा उद्‌गाता, लोकशाहीची डोळ्यात तेल घालून जपणूक करणारा कैवारी, समाजवादाचा निस्सीम उपासक, महान देशभक्त, हे जग सोडून गेला. एक समर्पित जीवन काळाने आपल्यापासून हिरावून नेले. सर्वांना अनाथ करून सर्वांचा हा नाथ आमच्यातून अकाली-एकाएकी सर्वाच्या हृदयाला चटका लावून निघून गेल. त्याच्याविषयी काय लिहावे, “झाले बहु, होतीलही बहु, आहेतही बहु परंतु या सम हा!”

## श्री. जयानंद शिवराम मठकर

ज्येष्ठ स्वातंत्र्यसैनिक, पत्रकार, कोकणातील समाजवादी आंदोलन, कामगार चळवळ, ग्रंथालय चळवळ आणि सहकारी चळवळीतील आघाडीवरील सक्रिय कार्यकर्ते म्हणून महाराष्ट्राला सुपरिचित.

व्यवसाय पत्रकारिता, १९६० पासून सावंतवाडीहून प्रकाशित होणाऱ्या 'वैनतेय' साप्ताहिकाचे आजतागायत संपादक.

पत्रकारितेच्या क्षेत्रातील बाळशास्त्री जांभेकर यांच्या स्मृत्यर्थ दिल्या जाणाऱ्या 'दर्पण' पुरस्काराचे मानकरी तसेच महाराष्ट्रातील ज्येष्ठ पत्रकार कै. नरूभाऊ लिमये यांच्या स्मृत्यर्थ दिल्या जाणाऱ्या 'आर्यभूषण' पुरस्काराचे मानकरी.

१९७४ साली सावंत वाडी विधानसभा मतदारसंघात झालेल्या पोटनिवडणुकीत महाराष्ट्र विधानसभेवर निवड. त्यानंतर १९७८ साली झालेल्या निवडणुकीत सावंतवाडी विधानसभा मतदारसंघातून महाराष्ट्र विधानसभेवर फेरनिवड. १९७९-८० या कालावधीत महाराष्ट्र विधीमंडळाचा अंदाज समितीचे अध्यक्ष.

सावंतवाडी येथे झालेल्या ४३व्या महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संमेलनाचे अध्यक्ष. १९९८-९९ या कालावधीत महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे अध्यक्ष. महाराष्ट्र शासनाच्यावतीने डॉ. रंगनाथन यांच्या स्मृत्यर्थ दिल्या जाणाऱ्या 'ग्रंथमित्र' पुरस्काराचे मानकरी.

'कोकण स्वप्न आणि वास्तव', 'कोकणाची राणी: कोकण रेल्वे', 'कोकणच्या विकासाचा जाहीरनामा', 'मनस्मृती ते मंडल आयोग', 'आपल्या ग्रामपंचायती', 'महाराष्ट्रातील बांधकाम व कृषी उद्योगातील कष्टकऱ्यांची कैफियत' या पुस्तकांचे लेखक.

बॅ. नाथ पै, प्रा. मधु दंडवते यांचे विश्वासू सहकारी.